मुलांच्या सर्वांगीण विकासासाठी

Cherry लँडचा

# धमालमस्ती

## दिवाळी अंक २०१४



भरारी प्रकाशन

किंमत रु.४०

# Cherry लँडचा
# धमाल मस्ती

## वर्ष तिसरे दिवाळी अंक २०१४


संपादिका
**लता गुठे**

सल्लागार संपादक
माधवी कुंटे

कार्यकारी संपादक
रवींद्र आवटी

सहायक संपादक
शंकर गुट्टे

निर्मिती
भरारी प्रकाशन



संपादकीय पत्ता
४०३,धनलक्ष्मी विहार, नंदा पातकर मार्ग,
विले पार्ले,(पूर्व), मुंबई-४०००५७
मो.९८७०६१७१२४,
lataguthe@gmail.com



मुद्रण
त्रिमुर्ती आर्ट प्रिंटर्स,
ए-२/२३८, शाह अँड नहार, इंडस्ट्रिअल इस्टेट,
लोअर परेल, मुंबई-१३




# शुभ दिपावली

*दिवाळी म्हणजे दिपोत्सव प्रेमाचा*
*दिवाळी म्हणजे साज-श्रृंगार देवीचा*
*दिवाळी म्हणजे आदर परंपरेचा*
*दिवाळी म्हणजे सण मुहुर्ताचा*

**अश्विनभाई शाह**



**दिवाळीच्या हार्दिक शुभेच्छा**

# अंतरंग

# संपादकिय



***दिवाळीच्या हार्दिक शुभेच्छा बालमित्रांनो,***

दिवाळीच्या सुट्टीत तुमच्या आवडत्या गोष्टीसोबत तुमच्या बरोबर असणार आहे 'चेरी लँड'चा 'धमाल मस्ती' तुमचा आवडता दिवाळी अंक. या वर्षी घेऊन येत आहे खास आपल्यासाठी सण, उत्सव, संस्कृती जोपासणारा दिवाळी अंक.ह्यामध्ये वेगवेगळ्या देशाचे राजकुमार, राजकुमारी, पऱ्या, शूर बालवीर तुम्हाला भेटणार आहेत. गोष्टीतील प्राणी, पक्षी तुमच्याशी चक्क गप्पा मारतील,मग आहे की नाही मज्जा!!

आजच्या मुलांच्या आवडीनिवडी याचा विचार करुनच मुलांना गोष्टीतून, गाण्यातून सकारात्मक विचार देण्याचे काम आमचे सर्व बालसाहित्यिक कारत आहेत.त्याचबरोबर संकृती, परंपरेची माहिती मुलांना व्हावी या उद्देशानेच या दिवाळी अंकाची रचना केलेली आहे. तसेच इंग्रजी व मराठी माध्यमातील मुलांना वाचनाची,लिखानाची आवड निर्माण व्हावी.हाही आमचा हेतू आहे.

मुलांनो मला तुमच्याशी बोलायला तुमचे विचार जाणून घ्यायला आवडेल. तुम्हाला आणखी काय हवं आहे ते ई-मेल पाठवून, फोन करून, मेसेज पाठवून जरूर कळवा हं. तुम्हालाही कविता, एखादी आठवण, शाळेतील गंमती जंमती,गोष्टी तुम्ही लिहून तुमचे साहित्य पुढच्या वर्षी दिवाळी अंकासाठी नक्की पाठवा तुमचे नाव, पत्ता, शाळेचे नाव,लिहून जरुर लिहा. तुमचे शिक्षक, आई-बाबा, मित्र-मैत्रिणी ते वाचून तुमचं खूप खूप कौतुक करतील.

हा अंक तयार करण्यासाठी अनेक मित्र, मैत्रिनींचे सहकार्य मिळाले त्यासाठी मी त्या सर्वांची खूप खूप आभारी आहे.तसेच जाहिरात दारांनी आर्थिक सहकार्य केले त्यामुळे मी त्यांचीही आभारी आहे. धन्यवाद आणि दिवाळीच्या हार्दिक शुभेच्छा.....

आपली स्नेहांकित
संपादिका
लता गुठे

*- Suman Phadke*

# CHERRY LAND



**C**

C for Camel.... C for Camel
It's neck is tall among all animals...

**H**

H for Honest... H for Honest
You try to be the Best



**E**

E for Elephant... E for Elephant
It's very Big & Giant

**R**

R for Ray... R for Ray
It starts the morning of day



**R**

R for Russet... R for Russet
Sun becomes so at sunset



**Y**

Y for wild Yak... Y for wild Yak
You can't sit on it's back



**L**

**A**

A for Air... A for Air
Which is everywhere

**N**

N for Neighbour... N for Neighbour
You should always give them honour



**D**

D for Dolphin... D for Dolphin
In the sea it is seen

# Puzzles

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | 8 | | | 4 | 3 | | 6 |
| | 6 | 7 | | | | | | |
| 9 | | | | 6 | 5 | 2 | 1 | |
| | 5 | | | | 1 | | | 3 |
| 4 | | | 3 | 2 | | 8 | 7 | |
| 6 | | | | | | | 9 | |
| | | 5 | | | 9 | | | 1 |
| 1 | 2 | | | 7 | 8 | 4 | | |
| 3 | | | | | | 5 | 6 | |

## दिवाळीच्या हार्दिक शुभेच्छा !

‘ *दिवाळी म्हणजे संस्कृतिची जोपासना*
*दिवाळी म्हणजे लक्ष्मीची उपासना*
*दिवाळी म्हणजे स्नेहाचा फराळ*
*दिवाळी म्हणजे पवित्र नात्याची आराधना* ’

# Puzzles - 2
## (Crosswords)




---

### Find the Path



# रांगोळी काढून रंगवा





## दिवाळीच्या हार्दिक शुभेच्छा !

'दिवाळी म्हणजे चैतन्याचा प्रकाश
दिवाळी म्हणजे सुखाचे आकाश
दिवाळी म्हणजे स्वप्नांची रांगोळी
दिवाळी म्हणजे ईश्वराचा सहवास'

# Crocodile & Monkey



Once upon a time, a clever monkey lived in a tree that bore juicy, red rose apples. He was very happy. One fine day, a crocodile swam up to that tree and told the monkey that he had traveled a long distance and was in search of food as he was very hungry. The kind monkey offered him a few rose apples. The crocodile enjoyed them very much and asked the monkey whether he could come again for some more fruit. The generous monkey happily agreed.

The crocodile returned the next day. And the next. And the next one after that. Soon the two became very good friends. They discussed their lives, their friends and family, like all friends do. The crocodile told the monkey that he had a wife and that they lived on the other side of the river. So the kind monkey offered him some extra rose apples to take home to his wife. The crocodile's wife loved the rose apples and made her husband promise to get her some every day.

Meanwhile, the friendship between the monkey and the crocodile deepened as they spent more and more time together. The crocodile's wife started getting jealous. She wanted to put an end to this friendship. So she pretended that she could not believe that her husband could be friends with a monkey. Her husband tried to convince her that he and the monkey shared a true friendship. The crocodile's wife thought to herself that if the monkey lived on a diet of rose monkeys, his flesh would be very sweet. So she asked the crocodile to invite the monkey to their house.

The crocodile was not happy about this. He tried to make the excuse that it would be difficult to get the monkey across the river. But his wife was determined to eat the monkey's flesh. So she thought of a plan. One day, she pretended to be very ill and told the crocodile that the doctor said that she would only recover if she ate a monkey's heart. If her husband wanted to save her life, he must bring her his friend's heart.

The crocodile was aghast. He was in a dilemma. On the one hand, he loved his

let his wife die. The crocodile's wife threatened him saying that if he did not get her the monkey's heart, she would surely die.

So the crocodile went to the rose apple tree and invited the monkey to come home to meet his wife. He told the monkey that he could ride across the river on the crocodile's back. The monkey happily agreed. As they reached the middle of the river, the crocodile began to sink. The frightened monkey asked him why he was doing that. The crocodile explained that he would have to kill the monkey to save his wife's life. The clever monkey told him that he would gladly give up his heart to save the life of the crocodile's wife, but he had left his heart behind in the rose apple tree. He asked the crocodile to make haste and turn back so that the monkey could go get his heart from the apple tree.

The silly crocodile quickly swam back to the rose apple tree. The monkey scampered up the tree to safety. He told the crocodile to tell his wicked wife that she had married the biggest fool in the world.

Moral: Don't underestimate yourself. There are bigger fools in this world.

*Wish You*
*Happy Diwali*
*from Cherry Land Team*







# दिन दिन दिवाळी...

मोहना कारखानिस



बालमित्रांनो,दिवाळी म्हणजे दिपोत्सव चैतन्याचा,आनदं आणि सुख,शांतीचा. शाळेला सुट्टी आणि धमाल मस्ती.तुमचे मित्र गोट्या आणि सामी दिवाळीच्या गंमती जमती सांगत आहेत तर मग वाचा..म्हणजे तुम्हालाही समजेल त्यांचा दिवाळीचा प्लॅन काय आहे तो ? गोट्याला आणि सामीला दिवाळीची आठवण झाली आणि आपल्याला खूप खूप छान वाटत आहे ह्याची दोघांनाही जाणीव झाली. ऑक्टोबर येईपर्यंत परीक्षा संपतील. अभ्यासाची काळजी मिटलेली असेल, आईची खरेदीची गडबड सुरु झालेली असेल, बाबा सुट्टीत सगळ्यांबरोबर काय करायचे प्लानिंग करत असतील.त्यांनी मनातल्या मनात दिवाळी साजरी करण्याचे चित्र रंगवायला सुरुवात केली. दिवाळीत आपले घर एक वेगळेच रूप लेवून साजिरे गोजिरे होते असे आई नेहमी म्हणते याची सामीला आठवण झाली. आईने घातलेली नऊवारी साडी तिला आठवायला लागली. एरवी आई पंजाबी सूट किंवा जीन्स घालते. ऑफिसला जाताना तिला हेच घालायला आवडते. पण दिवाळीत आई मुद्दाम पारंपारिक नऊवारी साडी नेसते.मला मात्र आईचे नऊवारीतील रूप ज्याम आवडते. सो कुल, दिवाळीत घरात सफाईला सुरुवात होते. सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे आई बाबा घरीच असतात. आपल्याबरोबर गप्पा मारतात, पत्ते खेळतात. बुद्धिबळ शिकवतात. सगळीकडे कसे आनंदाचे वारे वातावरण असते.पूर्वी म्हणे आपल्या एवढ्या मुली नऊवारी साड्या नेसायच्या. नाकात नथ घालायच्या, तुळशीला पाणी घालायच्या, लवकर उठायच्या, जात्यावर दळण दळायच्या. मागच्या वर्षी दिवाळीला गावाला गेले होते. त्यावेळी गावाला जाऊन आम्ही जाते वाडा, विहीर,शेती सारेकाही पाहिले. हिरव्या हिरव्या वनराईने नटलेली शेती-भाती बघीतली. गावात शेतीचा हंगाम संपला होता. घरात धान्याची पोती येऊन पडली होती. पूर्वी दिवाळीला चाळीस, पन्नास माणसे घरात जमायची. गावातील काकू सांगत होती,

“मग भल्यापहाटे उठून अंगाला उटणे लावून गरम-गरम पाण्याने आंघोळ व्हायच्या. तेव्हा गिझर नसायचे आंघोळीचे गरम पाणी बम्बातून तापवायचे, उटणे आजी घरीच करायची” हे ऐकून मला फार मजा वाटली. काकूच्या गप्पा ऐकत मी काकुच्या मागे मागे लुडबुड करत होते.काकू सांगत होती, ‘‘अश्विन वद्य द्वादशीपासून कार्तिक शुद्ध द्वितीयेपर्यंत जो दिव्यांचा उत्सव साजरा करतात त्या पर्वाला दिपावली म्हणतात.आपण घरात दिवे लावतो कारण दिवाळीच्या दिवशी आमवश्या असते. अंधाराला दूर सारुन प्रकाशाचे सामराज्य आपण निर्माण करतो. दिवाळीच्या दिवशी लक्ष्मीचे आगमन होते लक्ष्मी संपत्तीची सुख, समृद्धीची देवता ती चांगले आरोग्य घेऊन ती येते तिला नेहमी प्रसन्न ठेवावे. त्यासाठी आपले मन,तन पवित्र करावे दाराला तोरण लावावे आणि परिसर स्वच्छ ठेवावा.” हे सांगता सांगता काकू रांगोळी काढत होती. तिची लगबग, धावपळ सामी मोठ्या कुतुहलाने बघत होती. अधूनमधून नव्या कोऱ्या कपड्यांचा वास घेत होती.बघता बघता काकू आणि आई फराळाचे पदार्थ करायला लागल्या होत्या. शेव, चकली, चिवडा, बेसनाचे, रव्याचे लाडू दोन-तीन दिवसात तयार झाले. पक्वान्नांची रास पाहून सामी आणि गोट्याची खाण्याच्या बाबतीत लयलूट होती. भाऊबीजेला तर पाहुण्यांनी घर भरुन गेले. गप्पा-टप्पा, पत्ते, आट्यापाट्या आणि कितीतरी नवीन खेळ. सामीला जणू एका नव्या स्वप्नांच्या राज्यात शिरल्यासारखे वाटत होते.गावाकडील ते मंतरलेले दिवस कसे अगदी जादूसारखे सरले होते.सामी त्या आठवणीतून परत बाहेर आली तेव्हा गोट्या तिच्याकडे विचित्र नजरेने बघत होता.‘‘कुठे हरवलीस ?’’ तिला स्वप्नातून परत जमिनीवर आणत गोट्या म्हणाला. ‘‘काही नाही रे गावाकडची दिवाळी आठवली. किती मज्जा आली होती न मागील वर्षी ?
‘‘सामी, ह्या वर्षी पण आपण गावातील धम्माल इथे आपल्या घरात करू शकतो पण थोड्या वेगळ्या पद्धतीने ”
खरेच ?

गोट्या तू अगदी ग्रेट आहेस'' सामी उडी मारत म्हणाली. त्यानंतर बराच वेळ ते खलबते करीत बसली होती.

दिवाळी दोन दिवसावर येऊन ठेपली. आईने गोट्याच्या आणि सामीच्या मदतीने घर अगदी आरशासारखे लख्ख केले. ''बाबा ह्या वर्षी आकाश कंदील घरीच करायचा'' गोट्याने घोषणा केली. सामीने त्याच्या म्हणण्याला दुजोरा दिला. झाले, आकाश कंदिलाचे सामान घरी येऊन पडले. मुलांनी आणि बाबांनी रात्री जागून कंदील तयार केला. त्या कंदिलाकडे बघताना आईचा ऊर अभिमानाने भरुन आला. त्यामुळे आईने केलेले रव्याचे लाडू आणखीनच चविष्ट झाले.

नंतर आई-बाबांनी, गोट्या आणि सामीच्या मदतीने दिवाळीच्या फराळाचे पदार्थ बनविले. चकचकीत डब्यातून सगळे फराळाचे पदार्थ भरले गेले. दिवाळीच्या आदल्या दिवशी गोट्याने आणि सामीने आई-बाबांना आश्चर्याचा गोड धक्का दिला. ''आई, बाबा आम्हाला ह्या वर्षी नवीन कपडे नकोत. दर वर्षी तुम्ही आम्हाला नवीन कपडे घेता त्या पैशात आपण ह्यावर्षी काजूपाड्यातील मुलांना नवीन गोष्टीची पुस्तके घेऊन देऊ या.'"

आई-बाबा दोन्ही मुलांकडे कौतुकाने बघत राहिले.

" बाबा प्लीज आपण त्या सगळ्यांना भाऊ बीजेला घरी बोलावू या? मला त्या सगळ्यांना ओवाळायचे आहे. आई, बाबा तुम्ही आमच्यावर रागावणार तर नाही ना?''

''सामी, गोट्या, आई त्यांच्या खांद्यावर प्रेमाने हात ठेवून म्हणाली, ''बाळांनो, आज पहिल्यांदा तुम्ही आमच्याकडे काही मागितले आहे.ते सुद्धा स्वतःसाठी नाही. तर काजूपाड्यातील या गरीब मुलांसाठी, मुलांनो, स्वतःसाठी वस्तू, पुस्तके, कपडे कोणीही आणते. पण तुम्ही दुसऱ्याचा विचार करत आहात. कि नाही? गरिबीमुळे हे सगळे त्यांना मिळत नाही बिचाऱ्यांना खूपदा मन मारुन राहावे लागते. देवाच्या कृपेने आपल्याला खूप काही मिळाले आहे. आपल्याला चार घास मिळाले त्यातले दोन घास प्रेमाने त्या मुलांना दिले तर देव खूप आशीर्वाद देईल तुम्हाला मुलांनो.'' बोलता बोलता आईच्या डोळ्यात पाणी जमले. गोट्या आणि सामी आईच्या गळ्यात पडले.

''आमची छान छान आई.''

''ओके आता पुरे, चला कामाला लागा. त्या मुलांना इथे कसे, कधी बोलवायचे ते लवकर ठरवा बघू. त्यांच्यासाठी फराळाच्या तयारीला लागते.'' दिवाळीचा पहिला दिवस म्हणजे वसूबारस उगवला. सगळीकडे फटाक्याचा कडकडाट चालू होता. पण गोट्याने आणि सामीने भल्या पहाटे उठून घरभर तेलाच्या पणत्या लावल्या. बाहेर आकाश कंदीलाचा मंद प्रकाश पसरवत होता. सगळ्यांनी उटणे लावून साग्रसंगीत आंघोळी उरकल्या. देवाला नमस्कार करुन गावातल्या आजी आजोबांना फोन लावला. त्यांच्याशीं गप्पा मारुन त्यांचे पोट भरले. तरीही आईने त्यांना फराळाचे पदार्थ आग्रह करून पोटभर खायला लावले. नंतर गोट्या आणि सामी आपल्या मित्र-मैत्रिणींना घेऊन काजूपाड्यात गेले. तिथली वीस-पंचवीस मुले तयार होऊन त्यांची वाट बघत होती. गोट्या, सामी आणि त्यांच्या दोस्त मंडळींनी छान छान गोष्टीची पुस्तके आणली होती. त्यात Cherry Land हे मुलांसाठी असलेले पुस्तक होते. तसेच 'हनु लरन्स कॉम्प्युटर' हे पुस्तक सर्वांना खूप आवडले. मुलांच्या चेहऱ्यावरील आनंद बघून गोट्या आणि सामी खूप खूश झाले.

भाऊबीजेला संध्याकाळी काजूपाड्यातील दहा-पंधरा मुले गोट्या आणि सामीकडे जमली. आईने सगळ्यांना पोटभर फराळ दिला. त्यांच्यासाठी बाबांनी नवीन वह्या आणि पेन आणले होते. सामीने सर्वांना ओवाळले. त्यांच्या चेहऱ्यावरील आनंद बघताना सामी आणि गोट्याचे चेहरे बाहेर लावलेल्या पणत्यांच्या प्रकाशासारखेच उजळून निघाले. आणि मग हास्याच्या तुषारांनी आणि मुलांच्या किलबिलाटाने सारे घरच ह्यावर्षी आगळी वेगळी दिवाळी साजरी करतोय असे वाटून गेले.

मोहना कारखानीस

९८९२१३६५६



# दिवाळीची न्यारी रीत

दिवाळीने दिल्या आम्हा
पानाफुलांची तोरणं
घराघराला लागली
गाणी आनंदाची गात
आली गड्यांनो दिवाळी



केला पणत्यांनी असा
एकी करुन निर्धार
दूर सारू जगातला
काळा गडद अंधार



स्नान पहाटे पहाटे
दाटे उटण्याचा गंध
गोड खमंग खातांना
जीभ नाकारते बंध



दारापुढील रांगोळी
संस्कृतीचे हे प्रतीक
तिच्यामध्ये सामावले
रंग ठिपके कितीक !

दिसे आकाशकंदील
किती देखणा देखणा
लख्ख सुंदर भावना

सुख देते ती वाटून
बंगल्यात, झोपडीत
द्यावे साऱ्यांना सारखे
दिवाळीची न्यारी रीत



**गौरी कुलकर्णी**

# सुप्रियाची कथा

*माधवी कुंटे*



बुद्धदेवांच्या काळातील ही कथा! श्रावस्ती नगरीत अनाथपिंड नावाचा श्रीमंत व्यापारी रहात असे. त्याला सुप्रिया नावाची सुंदर गुणी मुलगी होती. सुप्रिया एकुलती एक होती आणि अनाथपिंडकाची फार लाडकी होती. सुप्रियाने काहीही हट्ट केला असता तरी त्याने तो पुरवला असता. पण सुप्रिया खूप शहाणी मुलगी होती. इतरांची दु:खे समजून घेऊन आपल्याला होईल तेवढे ती दु:खे दूर करण्याचा प्रयत्न ती करीत असे. वडिल तिला रोज सोन्याच्या दोन मोहरा देत त्या सुप्रियाने कधीच चैनीसाठी,मौजमजेसाठी खर्च केल्या नाहीत. सुप्रिया कधी कपडेलत्ते खरेदी करीत असे तर कधी धान्य खरेदी करीत असे. धान्याची रास किंवा कपड्यांचा ढीग घेऊन रोज ती वाड्याच्या प्रवेशद्वाराशी बसे तिच्या दारावरून जे अनाथ गरजू, दीन दरिद्री लोक जात, त्यांना ती गरजेपुरते धान्य आणि कपडे देत असे. सुप्रियाची परोपकारी वृत्ती पाहून अनाथ-पिंडकाला फार आनंद होई. तिच्या शांत प्रेमळ स्वभावामुळे वाड्यातील नोकरचाकर ही आपापल्या अडी–अडचणी तिच्या कानावर घालीत. सुप्रिया आपल्या शक्तीनुसार त्या अडचणी दूर करण्याचा प्रयत्न करी.

एकदा ती अशीच वाड्याच्या प्रवेशद्वाराशी बसली असतांना एक माणूस दोन गोजिरवाणी कोकरे घेऊन जातांना दिसला. तिने त्या माणसाला बोलावून म्हटले,

“किती सुंदर आहेत ही कोकरे! थांब त्यांना गहू देते.”

तिने त्यांच्या पुढे मूठमूठ गहू दिले. कोकरं गहू खात असताना तिनं विचारलं,

“कुठे नेत आहेस रे ही कोकरे?”

तो म्हणाला,

"एक श्रीमंत माणूस उद्या कसला तरी यज्ञ करणार आहे त्या यज्ञात बळी देण्यासाठी त्यानं ही कोकरं मागितली आहेत.दोघांची किंमत म्हणून चांगल्या दोन रुप्याच्या मोहरा देणार आहे."

ते ऐकून सुप्रियाचा जीव कळवळला. यज्ञात दोन लहानगे जीव बळी जाणार याचं तिला वाईट वाटलं. तिनं म्हटलं, "मी तुला जर तेवढीच किंमत दिली तर मला ही कोकरं विकशील?"

तो माणूस म्हणाला,

"चालेल की ताई! मला किंमत मिळाल्याशी कारण ती त्या माणसाकडून मिळाली काय किंवा तिमच्याकडून मिळाली काय! मला काहीच हरकत नाही."

त्याला थांबायला सांगून सुप्रिया तशीच आत गेली. तिने अनाथपिंडकाजवळ दोन रुप्याच्या मोहरा मागितल्या तेव्हा त्याने कशासाठी हव्यात? ते विचारलं. बळी जाणाऱ्या कोकरांना

सोडवण्यसाठी तिला पैसे हवेत हे ऐकून अनाथपिंडकाला फार समाधान वाटलं. प्राण्याबद्दल तिच्या मनातील सहानभूतीला त्याने उत्तेजन दिलं त्यानंतर तिला असं कुणीही पशुबळीसाठी जनावर नेत असतांना दिसलं तर ती ते सोडवून घेई. त्यासाठी योग्य तेवढी किंमत देई. आपल्या बारा तेरा वर्षांच्या मुलीच्या मनातील करुणा आणि इतरांची दु:खे दूर करण्याची धडपड पाहिली की अनाथपिंडक चकित होई. आपल्या मुलीला नीट मार्गदर्शन करणारा थोर गुरु हवा असं त्याला वाटे.

योगायोगाने त्याच सुमारास गौतम बुद्ध आपल्या शिष्य समुदायासह तिथे आले. बुद्धाचे प्रवचन ऐकून अनाथपिंडकाला खूप आनंद झाला. भिक्षू न होता संसारात राहून आपली मुलगी ही तत्त्वे आचरणात आणते तिला मार्गदर्शन द्यावे अशी त्याने बुद्धाला विनंती केली.

गौतम बुद्धांनी मुलीला घेऊन यायला सांगितले. फक्त बारा वर्षांची मुलगी अहिंसा, भूतदया, सहानुभूती, ही तत्त्वे आचरणात आणते याचे बुद्धांना मोठे कौतुक वाटले. तिची दिनचर्या त्यांनी ऐकली. तिने इतक्या लहान वयात श्रावस्तीतील अनेक अनाथ गरजू जिवांना मदत केली, दु:खी लोकांचे अश्रू पुसले बळी द्यायला नेले जाणारे निष्पाप मूक जीव वाचविले. हे ऐकून बुद्धांना समाधान वाटले.

यानंतर बुद्धदेवांच्या रोजच्या प्रवचनांना सुप्रिया हजेरी लावू लागली. ती भिक्षुणी संघाच्या महाप्रजापती गौतमींची पट्टशिष्या झाली. पुढे श्रावस्ती नगरीत दुष्काळ पडला, तेव्हा आपल्याकडे प्रवचनांना येणाऱ्या मोठाल्या व्यापाऱ्यांना बुद्धांनी सांगितलं की,

"गोरगरिबांना मदत करायला हवी."

पण त्या काळात कुणीही मदत करायला राजी होईना. सुप्रिया मात्र तहानलेल्यांना पाणी पाजत होती. भुकेने कासाविस झालेल्यांना जमेल तेवढे धान्य वाटत होती. पण ती एकटी कुठवर पुरी पडणार?



अनाथपिंडक आणखी धान्य विकत आणायला परगावी गेला. त्यादिवशी ती जेत वनात बुद्ध देवांकडे एकटीच गेली. त्या दिवशी बुद्धदेवानी थोर व्यापारी धनिकांना परत एकदा लोकांना अन्नदान देण्याचं आवाहन केलं.पण आपल्याजवळ अन्नसाठा अपुरा असल्याचं सांगून सगळ्यांनी हात झटकले.

बुद्धदेव डोळे मिटून बसले असतांना सगळ्यांनी काढता पाय घेतला. एकटी सुप्रिया बसून होती. बुद्धदेवांनी डोळे उघडले सगळे गेलेले पाहून त्यांना फार वाईट वाटलं ते म्हणाले,

"माझ्या धर्माची दीक्षा घेऊनही दुष्काळग्रस्तांसाठी कुणाचंच अंत:करण दयेने भरून येत नाही. कुणीही मदतीचा हात पुढे करत नाही"

सुप्रिया आत्मविश्वासाने म्हणाली,"मी करते मदत."

बुद्धदेव म्हणाले, "बाळा, तू एकटी कुठवर पुरी पडणार?"

सुप्रिया म्हणाली, "आपण मला फक्त आशीर्वाद द्या. मी काम सुरु करते."

बुद्धदेवांनी तिला मन:पूर्वक आशीर्वाद दिले.

दुसऱ्या दिवशी सामन्त राज जयसेन आपल्या कुटुंबियांसह जेवायला बसणार इतक्यात सुप्रिया आली. जयसेनने तिचं स्वागत केलं ती धनिक श्रेष्ठी अनाथपिंडकाची मुलगी होती. गावातील नामवंत घराण्यातील मुलगी होती. त्यानं सुप्रियाला येण्याचं कारण विचारलं. तिने हातातील कटोरा पुढे करत म्हटलं, "थोडीफार भिक्षा घाला."

जयसेन म्हणाला, "धनवान श्रेष्ठींची तू एकुलती एक मुलगी आणि अशी भीक मागतेस?"

सुप्रिया म्हणाली,"माझ्यासाठी नाही महाराज! दुष्काळात भुकेने तडफडून मरणाऱ्यांसाठी भीक मागते. आता दारोदार भिक्षा मागण्याखेरीज काही उपाय नाही."

जयसेनना शरम वाटली त्यांनी घरातून पोतेभर धान्य आणून तिच्या हवाली केले. अशा तऱ्हेने त्या दिवशी ती श्रावस्तीभर हिंडली धान्याच्या राशी जमा झाल्या. त्या तिने भुकेल्या लोकांना वाटल्या. ती खूप थकली होती. पण तिचं मन समाधानाने काठोकाठ भरलं होतं.

सुप्रियाचं हे कार्य ऐकल्यावर बुद्धदेवांना फार समाधान वाटलं! "माझी शिकवणूक ह्या एवढ्याश्या लहान मुलीने आचरणात आणली! सहकार्याने कोणत्याही संकटाचा सामना करता येतो आणि समाजावरील संकटकाळी सगळ्यांनीच त्याग करायचा असतो. हे तिनं आपल्या वागणूकीने दाखवून दिलं! प्रत्येक गावी अशी एक सुप्रिया असली तरी पुरे" असे बुद्धदेव म्हणाले. त्यांनी केलेल्या गौरवाने सुप्रियाला फार आनंद झाला. पुढेही आयुष्यभर तिने बुद्धदेवांची तत्त्वे आचरणात आणत असंख्य लोकांना मदत केली.

*माधवी कुंटे*

*९८१९६७९५५०*





# The Magic Pumpkin

Old Mother Parvati was a Bhilla. The Bhillas are a tribe of brown - skinned, dark-eyed people who live on the edge of the jungle in central india. Old Mother Parvati lived all alone in a mud-walled, thatch-roofed hut in the shadow of the dark, animal-filled jungle. But she was not afraid, because she had lived a long time and was very wise, and because she has the gift of magic. For Mother Parvati possessed a magic wand and a magic pumpkin.

The magic wand looked just like any other magic wand, but the magic pumpkin was something to be hold! It has a door which really opened, and windows you could see through, and it was so large that Mother Parvati could ride comfortably inside. Whenever she wanted to go somewhere, she would open the door of the magic pumpkin, step inside, and say, "Chal ra, Bhopalla tunuk, which means, "Come on, Pumpkin, turn faster, turn faster!" And then the magic pumpkin would begin to roll along the ground, faster and faster. When it stopped, Mother Parvati would find herself wherever she wanted to be.

One day Mother Parvati decided to visit her married daughter in the Village of Ghar-Bengal. Ghar-Bengal was quite a long distance away from Mother Parvati's hut, unless you traveled straight through the jungle, which was very, very dangerous. But Mother Parvati had a great deal of confidence in her own wits and in her magic, so she decided to travel through the jungle anyway.

She arranged her hair in three long braids, wrapped a clean sari around her wory brown body, and bundled a little pot of ghee into some jungle leaves as a gift for her daughter. Then she trod carefully through the cucumbers and eggplants and onions in her garden until she came to the enormous orange pumpkin. She opened the door and stepped daintily inside.

"Chal re Bhopallya, tunuk, tunuk!"

Mother Parvati said, and the pumpkin quivered and shook until the ground rumbled. The the big orange pumpkin began to roll, at first slowely and then faster and faster, until the pumpking and Mother Parvati inside were rolling along at a merry pace through the dark, mysterious jungle.

The rolling pumpkin made such a loud whirring noise that swarms of monkeys fled screaming through the treetops overhead. Worried flocks of birds flew straught up into the cluds, and small animals tried to make themselves invisible under the jungle leaves. But there was one great beast who wasn't frightened by the noise, and that was Vagha, the great folden tiger. Curious, he padded towards the sound. When he saw the strange whirling pumpkin, he stopped it easily by placing his heavy golden paw on the pumpkin's lid."Hmmmmm," said the tiger, "there's truth in what you say. But how do I know that you'II come back this way?"

"By the hair of Siva I promise that I will return this way, in a week or two or three," she answered,

When the tiger heard mother Parvati use such a holy oath, he knew that he could trust her. As he lifted his heavy paw from the top of the pumpkin, Parvati whispered, "Chal ra, Bhopalla, tunuk, tunuk!" once again, and the journey through the jungle resumed.

once more the noisy whirring of the magic pumpkin upset the routine of the jungle, Crows cawed in astonishment and the flat, expressionless eyes of a cobra stared in disbelief, while a leopard cub tripped over his own feet hurrying to get out of the way But again there was one great beast who was not frightened, but only curious. Kolha, the gray wolf, placed his large shaggy body in the path of the pumpkin and stopped it with a thud as it hit his side.

Mother Parvati was shaken a little by the dudden jolt, but she had time to recognize the rough gray coat of the great wolf.

"Aha!" said the wolf (but his "aha" sounded like "ahoooowl"), "all this livelong day I have wondered what to have for my supper, and now my supper has arrived in an orange pumpkin. What good fortune!"

"My Lord, Mother Parvati said in her weak, quavery voice, " My poor, skinny old body could hardly satisfy the hunger of a huge, ferocious beast like yourself" And once again she used her magic wand to make her self look withered and spindly. " I am going to Ghar Bengal to tiger, had been waiting for Mother Parvati to arrive. His stomach was rumbling with impatience and his temper was very short. As he padded back and forth along the leafy path he mumbled irritably to himself.

"Ho there, Vagh," the gray wolf called. "Why are you pacing the jungle in such an angry mood?"

"Ho there yourself, Kolha, The tiger raplied, " am waiting for an old lady in a pumpkin to come along."

How very strange!" the wolf declared. "I m waiting for an old lady in a pumpkin myself/"

"This lady is going to be my dinner. " said Vagha,

"How very strange indeed!" said Kolha. "This lady is going to be my supper."

"I don't ssssuppose it could be the sssssame old lady," the tiger hissed, showing his long, white



visit my daughter who cooks well enough to please a maharaja. After a few weeks with her I'II be plump and succulent. Why not waid until I return from my doughter's house, and eat me then?"

But how can I ne sure that you will return this way?" Kolha asked.

"By the beard of Veghdeo I promise to return!"

When he heard such a strong oath coming from the frail old lady, Kolha decided to release her. Soon the whirling pumpkin was on its way agains. and in less time than It takes to tell, Mother Parvati had reached the hut ger doughter, Uma

Mother and daughter lived in affection and harmony for the next few weeks, and Parvati did get plump eating Uma's good cooking Nut when it was time for Mother Parvati to return to her own home, Uma grew worried.

"Mother, I am so afraid that the tiger and the wolf will be waiting to eat you, Ima said "Please don't return through the jungle!"

But Mother Parvait only laughed. "I must return thought the jungle, dear Uma. I have sworn an oath." Seeing her doughter's troubled expression, she added, "Don't worry about me, my dear. Man is superior to any beast in the jungle, and when a woman gets to be my age." she chuckled, "She is smarter than most men."

So into her pumpkin Mother Parvati stepped. Because she knew exactly how she would outwit the tiger and wolf, she started the pumpkin with a "Chal ra, Bhopalla, tunuk, tunuk," and then closed her eyes for a little nap.

Deep within the jungle Vagha, the





teeth.
"I grrrreatly doubt it," the wolf grawled, showing his sharp, pointed teeth.
"Then sirrr, I shall eat the firrrrst old lady who appearrrrrs," purred the sly Vagh.
"You spiteful spoil-sport!" sputtered kolha. "You mustn;t spoil the splended supper I'm expecting!"
Just then the magic pumpkin whirled into view. Kolha and vagh both pounced on it, bringing the pumpkin to an abrupt halt.
With an angry wolf staring throught one window, and an angry tiger staring through the other most women would have been terribly frightened. But Mother Parvati rubbed her eyes as though she had just awakened, and in abewildered voice she asked, My Lords, your Ecellencies, What can I do for you?"
"Your Promised to be my dinner," Vagha snarled "You promised to be my supper Kolha barked. Now which one of us is going to eat you"?
Mother Parvati shook her head and blinked her eye She pretended to be very confused/" Oh dear! Oh dear me," She chirped, I do remember promising one of you that you could eat me. But which one was it? when a women gets to my age, her memory fails, you know."
You PORMISED ME!" the tiger roared.
"I WAS THE ONE PROMISED!" the gray wolf howled.
The huge beasts glared at one another, their noses only an inch apart. Kolha's fierce eyes blazed like the sun, and Vagh's ferocious eyes glittered like glowing coals. The rough hair along Vagha's spine rose straight up as Kolha slowly snak on his haunches preparing to leap. And then they sprang at one another. The Stillness of the jungle was shattered with thuds, thumps, hissed, howls, screeches, shrieks, rattles and roars as the animals spun in mad bout of clawing scratching, biting, tearing and so on.
Mother Parvati watched the melee for a few moments, her dark eyes dancing with mischief , and then she calmly said, "Chal ra, Bhopalla, tunuk tunuk." with a rumble and a whir the magic pumpkin rolled farther and farther away from the furious battle. At last the dark jungle was left behing and the pumpkin rolled into the sunlit garden of wise Mother Parvati.

mrs.shobha sakpal
vile parle(east) mumbai










शिक्षिकेने मुलांना क्रिकेटवर निबंध लिहायला सांगितला. आणि एक तासाचा अवधी दिला. सर्व मुले लिहायला लागली; पण चिंटू गप्प बसून होता. काय लिहावे कळेना. वेळ तर संपत आली होती. शेवटची ५ मिनिटे शिल्लक असताना चिंटूने लिहून टाकले, 'पावसामुळे मॅच कॅन्सल झाली'.

Principal: “I've had complaints about you, Johnny, from all of your teachers. What have you been doing?"
Johnny: "Nothing, sir."
Principal: “Exactly!”



मराठी माध्यमच्या शाळेत इंग्रजीचा तास चालू होता-

सर : बबन “Positive”, “Comparative”, “Superlative” डिग्रीचे उदाहरण दे.

बबन : (थोडावेळ विचार करून) “भारी”, “लय भारी”, आणि “लय म्हणजे लयीच भारी”.

The mother says to her daughter, "Did you enjoy your first day at school?"
The daughter answers, "First day? Do you mean I have to go back again tomorrow?”





# गोष्ट जुनी नविन संदर्भ



## अधुनिक लाकुडतोड्या

बाल मित्रांनो, तुम्हाला जुनी लाकुडतोड्याची गोष्ट माहित आहे का ?आमच्या आजी आजोबांनी सांगीतलेली ही गोष्ट तशी जुनीच आहे पण कदाचित तुमच्या आई बाबांनाही माहित नसेन.ऐकलेली असली तरी आठवणे जरा कठीणच आहे. कारण तुमचे आजी आजोबा बहुतेक तुमच्या जवळ नसतात,आई वडिलांना कुठे वेळ आहे गोष्टी सांगायला ? नाही म्हणायला तुम्हाला तरी ऐकायला वेळ थोडाच आहे ? तुम्ही, आई, बाबा सतत TV, Computer मध्ये नाहीतर Ipod,किंवा Mobile मध्ये Busy असता. त्यामुळे तुमचे डोळे व कान किती खराब होतात हेही तुम्हाला माहित नाही बर ते जाऊ दे, तुम्ही म्हणाल गोष्ट सांगायची सोडून हे काय बोलताय ? तर काय सांगत होतो ? हं! लाकुडतोड्याम्हणजे तुमच्या भाषेत Wood Cutter अगदी बरोबर.. गंगापूर नावाचे एक सुंदर गाव होते त्या गावात पूर्वीच्या काळी एक लाकुडतोड्या राहात होता. तो रोज लाकडं तोडण्यासाठी जंगलात जात असे.एकदा काय झाले..! लाकुडतोड्याची कुऱ्हाड लाकडं तोडता तोडता झाडाखालीच असलेल्या विहिरीत पडली.त्याच्याकडे एकच कुऱ्हाड होती तीही त्याच्या आजोबांनी दिलेली .आजोबाची आठवण म्हणून ती त्याणे खूप प्रेमाणे सांभाळली होती.तो विचार करु लागला आता आपण काय करायच बरं ?त्याला पोहताही येत नव्हते कशी काढावी हेही त्याला समजेना, मग तो लागला रडायला त्यावळी नेमके शंकर पार्वती - अरे आपल्या गणपती बप्पाचे आई वडील आकाशातून जात होते त्यांनी लाकुडतोड्याचा रडण्याचा आवाज ऐकला पार्वती म्हणाली शंकराला येथे इतक्या घनदाट जंगलात कोण बरे रडते आहे ? आपण त्याला मदत कारायला हवी.ते दोघेही लाकुडतोड्याच्या जवळ आले आणि त्याला रडण्याचे कारण विचारले सारा प्रकार लाकूडतोड्याणे त्याना सांगीतला.ते ऐकून शंकर देवांनी चक्क विहिरीत उडी मारली. पहिल्यांदा त्यानी सोन्याची ,मग चांदिची कुऱ्हाड काढून लाकुड तोड्याला विचारलं, “हीच का तुझी कुऱ्हाड ” ?तो म्हणाला, “नाही, परत देवाने तिसऱ्यांदा उडी मारून लोखंडाची कुऱ्हाड काढली ती दाखवताच लाकुडतोड्या लगेच आनंदीत होऊन हो म्हणाला, पण मग शंकर देवांनी काय केलं माहीत आहे का ? खरं बोलल्याबद्दल बक्षिस म्हणून लाकुडतोड्याला सोन्याची व चांदीची अशा दोन्ही कुऱ्हाडी दिल्या. बघितलं का मुलांनो, खर बोलल्याचा कसा फायदा होतो ते ? खोटं

बोलणारा देवालाही आवडत नाही. कळलं का ?लाकूडतोड्या घरी गेला त्याने घडलेला सारा प्रकार त्याच्या बायकोला व मुलाला सांगीतला.बरेच वर्ष लोटल्या नंतर ही गोष्ट त्याच्या नातवाला म्हणजे आजच्या लाकुडतोड्याला त्याच्या वडिलांनी सांगीतली तोही लाकुडतोडण्यासाठी त्याच जंगलात गेला.“पुढे काय झाले ? ऐका तर मग, आपल्या नवीन लाकुडतोड्यासाठी त्याची बायको दुपारी जेवणाचा डबा घेऊन गेली होती.डबा म्हणजे हं Tiffin त्या डब्यात होती पोळी भाजी बर्गर - पास्ता - नूडल्स या सारखे पोट बिघडवणारं काही नव्हतं. कळलं का मित्रानो ? बघा मी एकदा बोलायला लागलो की माझी असी पंचाईत होते. हं सांगतो पुढे काय झाले तेही.... तर ऐका, आता लाकुडतोड्याची बायको डबा त्याला देण्याच्या गडबडीत पाय घासरुन विहिरीत पडली झालं घाबरलेला लाकुडतोड्या परत आपल्या आधीच्या गोष्टीतल्या लाकुडतोड्यासारखाच रडायला लागला त्याला आजोबाचा प्रकार आठवला त्याने शंकरेला प्रार्थना केली त्याला संकटातून बाचवण्यासाठी तेथे शंकर पार्वती आले आणि त्यांनी त्याला रडण्याचे कारण विचारले, ‘‘अरे रडायला काय झालं ? परत तुझी कुऱ्हाड विहिरीत पडली का ? काळजी करू नकोस मी देतो ना काढून.

“नाही शंकर देवा माझी बायको पडली आहे विहिरीत आता तिच्या वाचून मी काय करु.”

“अरे मी आहे ना, अजिबात रडू नकोस.

लगेच शंकर भगवंतानी धाडकन विहिरीत उडी मारली व एका बाईला वर काढले आणि विचारले,“ ही आहे का तुझी बायको ” ? आजोबाची हकीगत त्याला आठवली लाकुडतोड्या हो म्हणताच देव रागावले कारण माहिती आहे का ? ती बाई होती कतरीना कैफ ! मग चिडलेले शंकर भगवान म्हणाले,“अरे तुझे आजोबा सोन्याच्या चांदीच्या कुऱ्हाडीला नाही म्हणाले होते. आता तसा प्रामाणिकपणा राहिला नाही.

“नाही देवा, मीही आजोबासारखाच प्रामाणिक आहे. मला कळतय सगळे पण माझ्या प्रामाणिकपणाबद्दल बक्षीस म्हणून कतरीना व करीना दोघींना मला बक्षिस म्हणून देऊन टाकली असती जर ! तर मोठी पंचाईत झाली असती. ”

“खरं आहे तुझं म्हणणं,पण म्हणून खोटं बोलायचं का ?

तुझी बायको नसतांना तू कतरीना कैफला हो म्हणालास ते बरोबर आहे का ? ”

“नाही देवा, पण मला गरीबाला साध्या सुध्या एका बायकोचे पोट भरता भरता नाकी नऊ येतात मग तीन तीन बायका घेऊन मी काय करू ? क्षमा करा मला माझ चुकलं. ”

शंकर पार्वती हसले व म्हणाले, ही घे तुझी बायको बक्षिस म्हणून असं म्हणून शंकर पार्वती निघूनही गेले. पण देवा मला बक्षिस नको असं म्हणत नाराजीणे लाकुडतोड्या खऱ्या बायकोचा चेहरा पाहून ओरडत झोपेतून जागा झाला. तेव्हा तेथे शंकर, पार्वती कतरीना कोणीही नव्हते.समोर बायको जेवण वाढत होती लाकूडतोड्या बावरलेल्या नजरेने तिच्याकडे पहात राहिला.

काय मुलांनो, आवडी का तुम्हाला गोष्ट ?

मुकुंद सराफ
विले पार्ले ,मुंबई



# संत गाडगे बाबा




त्याकाळी समाज गरीबी आणि अंधश्रद्धा यामुळे पिचलेला होता. त्या समाजाला मार्ग दाखविण्याचे कार्य गाडगेबाबांनी केले.

अशा महापुरुषाचा जन्म १८७६ च्या महाशिवरात्रीला झाला. आईचे नांव सखुबाई. वडिलांचे नांव झिंगराजी, आडनांव जानोरकर. त्यांचे नांव आधी देवू होते. नंतर डेबू झाले. ते जातीने परीट होते. वडिलांना दारुचे व्यसन लागले होते. त्यामुळे गाडगेबाबांचे जीवन लहानपणापासून कष्टमय झाले. ते खूप मेहनत करीत होते. त्यांचे लग्नाचे वय झाल्यावर कुंताबाईंशी त्यांचे लग्न झाले.

गाडगेबाबा लोकांना मदत करीत होते. त्यामुळे लोकांचे त्यांच्यावर प्रेम होते, श्रद्धा होती, विश्वास होता. पण ते फार काळ संसारात रमले नाहीत. त्यांनी संसाराचा त्याग केला. त्यावेळी त्यांना एक छोटी मुलगी होती. त्यांची बायको कुंताबाई गर्भवती होती.

ते हातात गाडगे घेवून समाजसेवा करण्यासाठी बाहेर पडले. ज्या गावी जात त्या गावाची स्वच्छता करीत. रात्री त्या गावी कीर्तन करीत. दुसऱ्या दिवशी ते गांव सोडून जात. शेतात काम करून शेतकऱ्यांना मदत करीत. याशिवाय ते मजुरांनाही मदत करीत. मंदिरासमोरील घाण, नाले साफ करीत. म्हाताऱ्याच्या डोक्यावरील ओझे ते स्वत: वाहत वाटेतील काटे ते दूर करीत.कुणी खायला दिले तरच खायचे.

जादूटोणा, अंधारेधुपारे, धागेदोरे हे थोतांड आहे. हे बंद झाले तरच समाज सुधारणा होईल. त्यासाठी लोकांनी शिक्षण घ्यायला पाहिजे. असे ते सांगायचे.

देवाची भक्ती करा,त्याला पैसा नको, पंचपक्वान्न नको, गरीब-श्रीमंत हा भेदभाव, जाती-पातीची बंधने नको. या पलीकडे जावून जी भक्ती असेल, त्या भक्तीचा परमेश्वर भुकेला आहे. त्याची भक्ती करा. नामस्मरण करा. कीर्तन करा. त्यांच्या कीर्तनात ते नेहमी, 'गोपाला-गोपाला देवकी नंदन गोपाला असे म्हणत."

त्याकाळी समाज गरीबी आणि अंधश्रद्धायामुळे पिचलेला होता. त्या समाजाला मार्ग दाखविण्याचे कार्य गाडगेबाबांनी केले.

अशा महापुरुषाचा जन्म १८७६ च्या महाशिवरात्रीला झाला. आईचे नांव सखुबाई. वडिलांचे नांव झिंगराजी, आडनांव जानोरकर. त्यांचे नांव आधी डेबू होते. ते जातीने परीट होते. वडिलांना दारुचे व्यसन लागले होते. त्यामुळे गाडगेबाबांचे जीवन लहानपणापासून कष्टमय झाले. ते खूप मेहनत करीत होते. त्यांचे लग्नाचे वय झाल्यावर कुंताबाईंशी त्यांचे लग्न झाले.

गाडगेबाबा लोकांना मदत करीत होते. त्यामुळे लोकांचे त्यांच्यावर प्रेम होते, श्रद्धा होती, विश्वास होता. पण ते फार काळ संसारात रमले नाहीत.

पशु, पक्षी, गाई, बैलावर प्रेम करा, भुकेल्याला अन्न द्या, अडाण्याला विद्या द्या. अशी शिकवण ते लोकांना कीर्तनातून देत असत. यातूनच समाज घडतो, असे गाडगेबाबा सांगायचे.

गाडगेबाबांनी समाजासाठी पुष्कळ कार्य केले. पण शेवटच्या काळात ते फार थकले होते. अखेर २० डिसेंबर १९५६ रोजी गाडगेबाबांनी देह ठेवला. एका कर्मयोग्याची प्राणज्योत मालवली.

–

*आतिश सुरेश सोसे*

# आपले मित्र

हिरवे-पिवळे बेडूकराव
चिखलात खूप खेळले
आंघोळ केली साबणाने
तर रंगच सारे उडले

कुंपणावरचा सरडा
होता खूप हुशार
आले कोणी अंगावर
रंग बदलून पसार







अरेऽऽरे
म्हशीची शिंगे
मोठाली आणि टोकदार
बाजूने जाणाऱ्या गाढवाचा
कोट फाटला आरपार

माशीला आवडे
आंब्याची साल
फऽऽर पंखचा
धरते ताल




किटक नव्हे विमान जणू
नाव त्याचे चतूर
पंख पसरता पारदर्शक
उडतो उंच दूर

# NATURE....A GREAT TEACHER...!



Nature is a great teacher
Each creature has a feature!

Ant carries great weight
But for Elephant she is a great threat

Caterpillar has many legs
Cranes have long necks!

Bats travel by sound
Snakes hear through ground!

Rats have strong teeth
They borough the ground beneath!

Squirrels have shrill voice
They make lot of noise!

Eagles have strong eyes
They can see through long miles!



When Owl turns its neck
Chills us with fear Oh heck!

Tortoise have the knack
To carry everything on strong b

Yet no one gets angry
Unless they are hungry!

They hunt to eat, But feed on n
Don't have the greed

Always gay in their own way
Nature is a great teacher.......!

**SURESH KULKARNI**
**(M) 9821964014**







# मुलांना नक्की खायला काय द्यावं ?



मुलांच्या खाद्य सवयी त्यांच्या आवडी-निवडी, मूड संभाळत आईला त्यांचा स्वयपाक करावा लागतो. या स्वयपाकाची खासीयत म्हणजे या स्वयपाकात भाजी-पोळी आमटी कोशींबीर असे जेवणाचे सामील न होता स्नॅक्सफूड सामील होत असतात. याचं कारण मुलांना एकतर जेवणाचा कंटाळा असतो. ह्यातच भाजी-पोळी म्हणजे त्यांच्यासाठी सक्तीचा आहार ठरतो.

मुलांना त्यांच्या आवडीचे पदार्थ करुन देण. पण त्यांना त्या नेहमीच्या स्नॅक्स मध्येही नाविण्य लागतं. बरं हे स्नॅक्स मुलांसाठी परिपूर्ण आहार ठरत नाहीत. त्यामूळे मुलांना परिपूर्ण आहार अन् त्यांच्या आवडीनुसार काय द्यावं हा प्रत्येक आईसाठी एक मोठा प्रश्न असतो परिपूर्ण आहार मूलांच्या वाढीसाठी,त्यांच्या सर्वांगीण विकासासाठी अत्यावश्यक असतो. पण असा आहार मुलं सहजरीत्या खाण्यास तयार होत नाहीत. अश्याच काही मुलांच्या आवडीच्या पण आहारमूल्यांनी परिपूर्ण अश्या नाविण्यपूर्ण रेसिपीज.

स्प्राउटेड मॅगी

साहित्य - २ व्हेज नुडल्स किंचा मॅगी. प्रत्येकी पाव वाटी अंकुरीत मूग, मटकी, वाटाणा व ऐच्छीक कडधान्य. प्रत्येकी १ चमचा चिली टेमॅटो, शेजवान सॉस, २ चमचे तेल थोडीशी हिरवी कांद्याची पात.

कृती - सर्व कडधान्य स्वच्छ धुवा एकत्र करा ५-६ तास रुमालात बांधून ठेवा. एका पॅनमध्ये नुडल्स-मॅगी साठी पाणी उकळा त्यात नुडल्स मॅगी घाला. उकळून घ्या. चाळणीवर निथळून घ्या. एका मोठ्या पॅनमध्ये तेल तापवा. त्यावर आल-लसूण परता. सर्व सॉस घाला हलकस परता आता यात सर्व कडधान्य घाला, मोठ्या आचेवर खमंग परता. कडधान्य शिजत आल्यावर त्यात उकडलेल्या नुडल्स घाला, मिठ मिरीपूड घाला व व्यवस्थीत परतवा. पात घालून सर्व्ह करा

सध्याची किशोरवयीन मुंल स्वावलंबी बनत असून लहान-सहान गोष्टी त्यांचे तेच मॅनेज करतात. आपल्याला पहायला मिळत. भूक लागल्यावर आईची वाट पाहत बसण्यापेक्षा ते स्वत:च एवादा पदार्थ शिजवून घेण सोयीच मानतात. सध्या टि.व्ही वर अनेक खाद्यपदार्थाच्या जाहीराती पहायला मिळतात. ज्यातून लहान मूल देखील सहजरीत्या स्वंयपाक करु शकतील. किशोरवयीन मुलांना करता येण्याजोग्या अश्याच काही सोप्या पाककृती.

सिंपली एग टोस्ट

साहित्य - २-४ ब्रेड स्लाईस, १ अंड, चिली, टोमॅटो सॉस, मिरीपूड, मिठ

कृती - तवा तापत ठेवावा. त्यावर अंड फोडून घालाव. मंद आचेवर आम्लेट होऊ द्याव. वरुन मिरुपूड, मिठ भुरभुरावे. आम्लेट खालून सेट झाल्यावर ते हलकेच पलटावे (बलक हलते त्यामुळे काही फरक पडत नाही) टोस्टर मधून ब्रेड लावून घ्यावेत. त्यांाा सॉस लावावेत. दोन स्लाईसच्या मध्ये आम्लेट ठेवाव. त्रिकोणी कापा व खाण्यास घ्याव.

स्वप्नील वाडेकर

# Come on ! Welcome to..

Cherry Land, Cherry Land cherishing land
Heaven on the earth, is at your hand.

Enjoy, smile, dance and sang
Run, make of fun, chat, swim and swing.



Read the message, in green words
You will see the, worid of wonders.

Learn the secret of bloom and blosson.
Advice of purity is devine and ousum.

Nature behaves like a true friend ever .
Don't be uncared, for such a favaur.



Suman shreeram phadke

# कथा विवेकानंदांची



नरेंद्र हे स्वामी विवेकानंदांचे लहानपणीचे नाव. कलकत्यातील सिमोलिया पथावर त्यांच्या वडिलांचे मोठे घर होते. विश्वनाथबाबू दत्त हे कलकत्त्यातील एक नावाजलेले वकील होते. कलकत्यातच नव्हे, तर साऱ्या बंगालमध्ये त्यांची किर्ती पसरलेली होती. गोरगरीबांपासून श्रीमंतांपर्यंत सर्वजण त्यांच्याकडे काम घेऊन येत. सर्वांचीच कामे विश्वनाथबाबू आपलेपणाने करीत.ते खूप पैसे कमवीतही आणि दानही खूप करीत.नरेंद्रच्या आईचे नाव भुवनेश्वरीदेवी त्या प्रसन्न,शांत,सात्विक आणि सदाचरणी होत्या. विश्वनाथबाबूंना सर्व कामांमध्ये मदत करत.

आपल्याला तेजस्वी मुलगा व्हावा अशी त्यांची इच्छा होती.म्हणून मग घरातील एका वयस्कर बाईच्या सांगण्यावरून भुवनेश्वरीदेवी काशीला गेल्या आणि तिथे विश्वेश्वरापुढे तपश्चर्या करू लागल्या. एके दिवशी त्यांची तपश्चर्या फळाला आली आणि भगवान शंकरांनी दृष्टांत देऊन सांगीतले "तुझी मनोकामना पूर्ण होईल"

त्या कलकत्त्यास परतल्यावर यथासमय त्यांना मुलगा झाला! काशी-विश्वेश्वराच्या कृपेने झालेला हा मुलगा, म्हणून त्याचे नाव ठेवले वीरेश्वर. पण वीरेश्वर हे म्हणायला थोडेसे कठीण, म्हणून आई त्याला प्रेमाने म्हणे बिले.

नरेंद्र हे त्याचेच दुसरे नाव. पुढे विवेकानंद झालेला हाच तो नरेंद्रनाथ. १२ जानेवारी १८६३ हा त्याचा जन्मदिन.मकरसंक्रांतीचा तो शुभदिन होता.लहानपणापासूनच विवेकानंद हुशार,तल्लक बुध्दीचे आणि विचारी होते.त्यांना अनेक प्रश्न पडत आणि जोपर्यत त्यांना त्याचे उत्तर मिळत नसे तोपर्यंत ते शांत बसत नसत.एके दिवशी शाळेला सुट्टी होती उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळे अंगणातल्या मोठ्या चिंचेच्या झाडाखाली ते मित्रांबरोबर खेळू लागले त्यांचा गोंगाट ऐकुण शेजारचे आजोबा वैतागुण बाहेर आले त्यांना हकलवण्यासाठी ते म्हणाले,"मुलांनो,या झाडावर एक भूत आहे.त्याला राग आला की ते अधारात येऊन कोणाच्याही गळ्याला पकडते "

त्यावर विवेकानंद म्हणाले,काय हो आजोबा,माझी आई सांगते भूत वैगेरे असे काही नसते.आपल्या मनातील भीतीमुळे आपण उगीचच घाबरतो"



आजोबा शूरपणाचा आव आणून म्हणाले,"हे बघ बिल्लू बाळा तू घाबरु नये म्हणून तुझी आई सांगत असेल पण मी माझ्या डोळ्याणे पाहिले आहे ना "

"हो का ?मग मलाही भूत पाहायचं आहे ,मला दाखवणार का ते भूत ?"

"असे काय कधीही दिसत नाही ते रात्री बाराच्यानंतर दिसते "

"रोज दिसते का हो आजोबा ते भूत तुम्हाला ?" त्या आजोबाच्या डोळ्यात पहात धिटपणे म्हणाले,ते आजोबा खोटे बोलत आहेत हे विवेकानंदांना माहित होते.परंतु सर्व मुलं घाबरली होती.त्यांना कितीही समजवले तरी चिंचेच्याखाली खेळायला येत नव्हती दुपारी नरेंद्रला कंटाळा येऊ लागला.त्यांचा आईच्या बोलण्यावर विश्वास होता मनात भिती नव्हती पण मित्रांच्या मनातली भिती घालवण्यासाठी यावर काहीतरी युक्ती करायला हवी असे त्यांनी ठरवले.मित्रांना सागितले, "मी आज रात्री चिंचेखाली भूत पहायला जाणार आहे जर तुम्हाला पहायचे असेल तर तुम्हीही येऊ शकत "कोणीही तयार झाले नाही नरेंद्र सरळ त्य आजोबांना भेटले व म्हणाले,"मी आज भूत पहायला येणार आहे जर मला आज भूत दिसल नाही तर तुम्ही माझ्या मित्रांना सांगायचं भूत नसतं म्हणून आणि तुम्ही का खोटं बोललात तेहे सांगणार आहात काय?

मध्ये रात्री बरोबर बारा वाजता ते हळूच आवाज न करता घरातून बाहेर पडले व चिचेच्या झाडाखाली जाऊन बसले.नरेंद्र खरच जातोय का? खरच भूत असेल तर ते नरेंद्रला काय करेल? भूत कसं दिसत असेल? या सर्व उत्सुकतेपोटी सर्व मित्र हातात बॅट्री घेऊन घराच्या गच्चीवरून लपून पाहू लागले नरेंद्रला भिती दाखवण्यासाठी आजोबांनी वेगवेगळ्या प्रकारचे आवाज काढले परंतु बिल्लू म्हणाला,"हे भुता माझ्यासमोर ये मला तुला भेटायचं आहे" शेवटी सकाळ झाली तरी ते भूत काही समोर आलं नाही शेवटी आजोबांना नरेंद्रच्या धाडसाची कमाल वाटली सर्व मुलांसमोर आजाबांनी सर्व खरं सांगूण माफी मागीतली.परत झाडाच्या अंगाखांद्यावर, झाडाखाली मुले आट्यापाट्या खेळण्यात दंग झाली. अशा एक ना दोन अनेक गोष्टी विवेकानंदाच्या हुशारीच्या धाडसाच्या आहेत .

मुलांनो, आवडली ना गोष्ट ? मग आता तुम्हीही लक्षात ठेवायचं आहे कोणी कितीही सांगीतले तरी भूत हे नसते , म्हणून अशा काल्पनिक गोष्टीवर विश्वास ठेवायचा नाही.काय राहिलं ना लक्षात ?



# परोपकार



श्री. एकनाथ आव्हाड

एक होतं झाड, हिरवंहिरवंगार उंचउंच आणि डेरेदार. झाड होतं आंब्याचं उन्हाळ्यात या झाडाला खूप आंबे येत. ते झाड वाटसरुंना उन्हात सावली देई अन् सावलीबरोबर गोड रसाळ आंबेसुध्दा भरभरुन देई, पण त्या बदल्यात ते माणसाकडून काहीच मागत नव्हतं. देणं हेच त्याला ठाऊक.

पावसाळ्यात त्या झाडाला पाणी मिळाले की, पाणी पिऊन ते झाड हुशार व्हायचं आणि मग पानाची सळसळ करुन ते त्या पावसाचे आभार मानायचं. माणसाने मात्र त्या झाडाला कधीच पाणी घातलं नाही. तरी ते झाड माणसावर कधी रुसलं नाही. रागावलं नाही. आपली मुळे जमिनीत खोलवर घालून पावसाचं जमिनीत जिरलेलं पाणी ते शोशून काढायचं आणि त्या जमिनीतील पाण्यावर गुजगोष्टी करत ते डौलानं डोलायचं.

एकदा काय झालं वैशाखाचा महिना होता. त्या आंब्याच्या झाडाला खूपच आंबे लागले होते, पण ते अजून चांगले पिकले नव्हते. थकला भागला एक वाटसरु त्या आंब्याची पसरलेली दाट सावली पाहून त्या सावलीच्या आश्रयाला आला. निवांत थोडा वेळ तो बसला. गार वारा अंगावर घेत विसावला. थोड्या विश्रांतीनंतर झाडाला लागलेले आंबे पाडण्यासाठी तो काठी धरुन त्या झाडावर चढला, त्यानी आंब्यासाठी त्या झाडाला काठीने चांगलेच झोडपले. झाडाला लागलेले अर्धे कच्चे आंबे पटापट खाली पडले पण त्या बरोबर आंब्याची पाने ही खाली पडली. काही फांद्याही तुटल्या. आंब्याचा अन् पानाचा खच खाली पडला. झाडाचं विव्हळणं त्या माणसाला ऐकू गेलच नाही. काठीने झाडावर प्रहार करणं त्या माणसाच चालूच होतं. तेवढ्यात काढीच्या मारानं त्या झाडावरचं एक चिमणीचं घरटं धपकन खाली पडलं. त्या तुटलेल्या घरट्यातून इवलीशी चिमणीची पिल्लं चिव चिव करत बाहेर आली. घाबरलेल्या, भेदरलेल्या त्या पिल्लांची चिव चिव वाढली त्यांच्या पंखात उडण्याचं बळ अजून पुरतं आलं नव्हतं.

त्या पिल्लांची वाढणारी चिव चिव ऐकून झाडाला असह्य झालं. त्याला राहावलं नाही. आता क्षणभर झाडाची सळसळ वाढली आणि एकाएकी ते झाड त्या माणसाशी बोलू लागलं,

"कशाला मारतोस मला ? अरे माझ्यावर लगडलेले आंबे पिकून मीच खाली पाडतो. त्या बदल्यात मी मोबदला तुझ्याकडून घेत नाही".

माणूस शांतपणे ऐकत राहिला. तो झाडावरुन हलकेच खाली उतरला. झाड पुढं म्हणालं, "उन्हातान्हात उभा राहून मी सावली देतो. पानं देतो, फळं देतो, त्या चिमणीने मोठ्या कष्टाने एक एक काटकी जमवून माझ्या आश्रयाला घर बांधलं, त्या घरट्यात तिनं पिलांना जन्म दिला, त्या घरट्यातील ती निरागस पिल्लं पाहून त्यांची बागडणारी चिवचिव ऐकून केवढी आनंदित व्हायची. पण आज तू त्यांच घरट मोडून टाकलस. ती खाली पडलेली पिल्लं पाहून मला अतोनात दु:ख झालय. त्या पिल्लांनी तुझ काय वाईट केलं होतं ?"

झाडाच्या या प्रश्नावर माणसाकडे उत्तर नव्हतं. तो निमुटपणे ऐकत राहिला.

"तुला माहीत आहे, या झाडाच्या आश्रयाला अनेक जीव येतात. माझ्या बुंध्यापाशी बघ केवढी मुंग्याची, मुंगळयाची रांग आहे. माझ्या फांद्यावर नाना प्रकारचे पक्षी येतात. कधी पोपट, कोकीळा, कावळा, खंड्या, चिमणी, चतुरपक्षी तर कधी मैना. त्यांची सोबत मला खूप आवडते. अनेक किटक, किडे माझ्या फांद्यांवर मनसोक्त फिरतात. हा सगळा माझा गोतावळा आहे. पण तू माझा सगळा गोतावळा माझ्यापासून दूर करु पाहतोस. अरे, पण तू माझी सगळी पानच गळून पडली, फांद्या तुटून पडल्या तर कोण आश्रयासाठी माझ्याजवळ येईल ? माझ्या अंगाखांद्यावर राहिल."

झाडाचं सारं बोलणं ऐकल्यावर माणसाला त्याची चूक कळून आली. स्वत:चाच त्याला खूप राग आला. त्याला वाटलं माणूस किती स्वार्थी आहे. स्वत:पुरतच पाहतो, स्वत:चाच विचार करतो. पण हे झाड मात्र इतरांचा विचार करतं. किती परोपकारानं जगतं. झाडाचा हा एक जरी गुण माणसांनं उचलला तरी त्याचं आयुष्य या झाडासारखं बहरुन जाईल. त्याने हातातली काठी दूरवर भिरकावून दिली. अन् खाली पडलेल्या त्या चिमणीच्या पिल्लांना अलगद मायेने जवळ घेतले.

श्री. एकनाथ आव्हाड
९८२१३३९६३५



# Raghu and Silly





Raghu is repeating the spelling 'Temporary' . He thinks this is a difficult word. He do not like this word at all. But his Dad has told him this word and its meaning. Dad has made him, "to learn the spelling. Dad uses this word often. Because Raghu is with his dad and Mom in a 'temporary' home.

Raghu's new home is far away from his old home. Raghu is missing his friends. Here he cannot play with chunny, Munny, Guddi, Raju and others. His Dad has promised that they will go back to their old home when it will be redeveloped into a new tall tower. 'Redevelopment' is another big word to learn! Raghu's Dada has gone to the States for three years. Raghu's Mom says that after three years Dada will come back. So too all of them will go back to their old home after three years.

Meanehile sad Raghu is alone without his friends and Dada. He is standing in the balcony. A big Jamun tree is spreading its arms and calling him. The tree is evergreen. Raghu's Mom tells him that there will be sweet, purple Jamun fruits on the tree in May and June. It is December now. The brown branches and green leaves look like a print on a blue bed sheet of sky.

Suddenly there is a chirping sound, Raghu tries to immitate it. But he cannot do it properly. Raghu can say 'Kow Kow' exactly like a crow. But he cannot chirp. A small creature with eyes like beads is looking at Raghu. Is it a mouse? He wonders! But this little creature does not have a tail like a mouse. Is it a house-lizard? raghu does not like lizards. He tries to disturb away the creature on the tree. But it is not scared by Raghu's voice. Then Raghu looks at the beautiful tail. Oh! it is like a grey paint - brush. 'Mom, mom, come here! I want to show you something.' Raghu's mom came near him and said. 'It is a squirrel Raghu! 'Can I Catch it and keep it as a parrot in a cage, mom? Raghu asks.

'Would you like to be bound to this balcony and stay in one place? No ! answers Raghu. Then it is better to leave her alone. Can I give her a name-Silly? 'Yes of cause you can!'

Raghu finds a new friend in Silly. Every morning he spends watching Silly Sometimes Silly joined by another squirrel. Raghu named it Sally,' Silly and Sally are forever playing Hide and Seek on the tree. They can easily jump from branch to branch. Silly looks very pretty. She stands on her hind lags and holds something in two tiny hands. Her mouth is eating some thing from her own hands. Her tail is spread like a brush. Raghu tries to feed pea-nuts from his hands to Silly. But Silly never comes near him. She always stares at Raghu from a long distance. Sometimes Raghu is inside when Silly jumps on the balcony-railing. Silly and Sally are swift runners. Raghu enjoys their play. He never tries to catch them. He remembers his mother's warning. Who will like to be tied down in a cage? Silly and Sally are always chirping. Raghu Cannot copy their voice.

This year, Raghu gets a novel gift for his birthday. It is an instrument called ' Binoculars,' Raghu's Dad teaches him to use his gift. Dad holds it near Raghu's eyes and asks him to look at the Jamun tree. Raghu is surprised. Silly and Sally are staring back at Raghu. They seem so near, as if he can touch them. The brown-black-white strips in their body are charming. Raghu extends his hand to touch them. Raghu's Dad and Mom start laughing at him. Raghu's mom takes him near a mirror and says. 'Raghu, can you see the other Raghu in the mirror? You cannot touch him. It is your image. It is not real you. So too you cannot touch Silly and Sally. But you can watch their play closely. They are up and away on the tree only, Because of a special glasses, they seem bigger and near. Raghu runs back to the balcony with his new gift.

Day by day, he is becoming expert in using the binoculars. Sometimes he finds new birds on the tree. Soon three years are over. Raghu is older. He goes now every Sunday with his Dad to a bird-watcher's club. Bird-watching is Raghu's new hobby. Raghu's Mom is no longer worried. Raghu gets fresh air when he goes out for treking and bird-watching. He is no longer stuck to the cartoon channel. To watch Chipmunks on T.V. is forgotten. Raghu's Mom thanks Silly and Sally for the change in Raghu. Raghu and his friends enjoy Bird watching.

Kalpana Kothare
022-26104552



# JUNGLE

Look at the animals- birds and fill in the missing
vowels for each animal name

| | |
|---|---|
|  | P _ r _ _ t |
|  | L _ o n |
|  | M _ n _ e y |
|  | D _ c k |
|  | E _ e _ h _ n t |
|  | H _ _ e |

# १०० शोधांचा जनक
## एडिसन -





एडिसन यांना शोधांचा जनक असे म्हटले जाते, कारण त्यांनी १०० पेक्षा जास्त शोध लावले आहेत. एडिसन यांचे पूर्ण नाव थॉमस एडिसन. त्यांचा जन्म फेब्रूवारी १९५७ साली झाला. लहान असतांना ते तुमच्या सारखे खट्याळ व चौकस वृत्तीचे होते. त्यांना विज्ञानाची पुस्तके वाचायला अतिशय आवडत असत. त्यांना आई, वडलांनी, शिक्षकांनी एखादी गोष्ट सांगीतली की ती ते सहजा सहजी मान्य करत नसत. त्यांना पुरावे द्यावे लागत. विज्ञानाची पुस्तके वाचून लहाणपणी सोपे सोपे प्रयोग करत असत. ते केल्यानंतर त्यांच्या बुध्दीमत्तेचे सर्वांना कौतूक वाटत असे. लहाण असतांनाच वाफेवर चालणारे इंजिन तयार केले. शाळेत असतांनाच त्यांच्या घरातच एका खोलीत छोटीशी प्रयोगशाळा तयार केली होती. ते वाचलेल्या, पाहिलेल्या अनेक गोष्टींवर खूप विचार करत असत. असे का? तसे का? हे असेच का होते? ते तसच का? असे एक ना दोन अनेक प्रश्न त्यांच्या मनात निर्माण होत असत. एडिसनच्या डोक्यावर परिणाम झाला आहे असे समजून एडिसनला शाळेतून काढून टाकले. त्यानंतर त्याची आई शिक्षिका असल्यामुळे तीने एडिसनला घरीच शिकवले. त्यांची घरची परिस्थिती तशी गरिबीची होती. त्यामुळे त्यांना प्रयोग करण्यासाठी सामान विकत घेणे शक्य होत नसे. त्यामुळे रेल्वेमध्ये पेपर सामान, चॉकलेट विकायला सुरुवात केली. थोडे पैसे जमले की लागणारे सामान विकत घेतले. ते सामान वापरुन टेलिग्राफचे उपकरण शोधून काढले. त्यानंतर वयाच्या अवघ्या १५ व्या वर्षी प्रिन्टर तयार केले. दुसऱ्या महायुध्दाच्या काळात त्यांनी प्रिन्टरवर वर्तमान पत्र छापले. त्यामध्ये ते युध्दाच्या बातम्या छापत असत. त्यांच्या वृत्तपत्राचे नाव 'विकली हेराल्ड'.

एकदा वर्तमानपत्रे विकण्याच्या नादात ट्रेन सुरु झाली. त्यांचे लक्ष नव्हते, गाडीतून खाली पडत असतांना रेल्वेच्या गार्डने त्यांना कानाला धरुन आत ओढले त्यामुळे ते बहिरे झाले तरी त्यांनी त्याकडे लक्ष न देता आपले काम चालूच ठेवले. रेल्वेच्या डब्यात त्यांनी प्रयोग शाळा सुरु केली. तेथेच त्यांनी टेलिग्राफिचे यंत्र बनवले. ते विकून त्यांना ४०,००० डॉलर्स मिळाले. त्या पैशातून त्यांनी न्यूसर्जी येथे प्रयोग शाळा सुरु केली १९६८ साली. इलेक्ट्रिक बल्बचा शोध लावला, पिक्चर कॅमेरा, फोनोग्राफ, विजेच्या दिव्यांचा शोध लावून क्रांती घडवून आणली.

एकदा एक छोटासा मुलगा रेल्वे फाटकात खेळत होता. समोरुन भरधाव वेगाने एक ट्रेन येत होती. ते एडिसनने पाहिले पटकन उचलून बाजूला खेचले. तो मुलगा स्टेशन मास्टर मॅकसी यांचा होता. एडिसनच्या उपकाराची फेड समजून त्यांनी आगगाडीच्या तारा यंत्राचे शिक्षण दिले. तेथेच त्यांना टेलिग्राफ ऑप्रेटरचे काम दिले. १९६९ मध्ये एडिसन टेलिग्राफचे इंजिनियर झाले.

# जंगलातील गम्मत

**एक लहान मुलगी आईवर रागावली. आणि फुरगटून, दूर, घराच्या कोपऱ्यात जाऊन, आपली खेळणी हाताळत बसली. ते करता-करता तिचा डोळा लागला. डोळे मिटताच लगेच एका क्षणात पोचली जंगलात. तिच्या खेळण्याचे झाले खरेखूरे प्राणी, आणि ते तिच्याशी खेळायला आले. तिच्याभोवती फेर धरुन नाचायला लागले.**



सगळे प्राणी :
आम्ही दोस्त सगळे, आलो खेळायला तुझ्यासंगे गऽ
गंमत-जंमत ही आपुली तू नको कुणाला सांगू गऽ



ससा :
मी आहे बघ कसा चिमुकला, मउ-मउ गोरे माझे अंग
टुणुक-टुणुक मी उड्या मारतो, पाहुन होती सगळे दंग
कान उबारुन आपुले, घेतो येणाऱ्याची चाहूल गऽ।।



अस्वल :
मी आहे अस्वल, माझे हे काळे-काळे केस पहा
मध शोधाया भटकत फिरणे, आहे माझा छंदच हा
मित्र आहे मी तुझा, घाबरु नको तू मला पाहून गऽ



वानर :
मी आहे अति-खट्याळ वानर, नारळ मजला आवडतो
झाडांवर मी उड्या मारतो, वेडावूनही दाखवतो
चल ये, मारु उड्या-उंच आपण दोघे झाडावर गऽ।।
हत्ती :
मी हत्ती, बघ शरीर माझे अगडबंब हे कितीतरी
डुलत-डुलत मी सदा चालतो, त्यातच आहे मजा खरी
नदीकडे चल, मी घालेन आंघोळ तुला सोंडेने गऽ।।



सिंह :
मी जंगलाचा राजा सिंह, मीही दोस्त तुझा आहे
आलो मी तुजला भेटाया, तसेच मैतर सगळे हे
मिळून आता आपण सगळे, चल खेळामधि रंगू गऽ।।





सगळे प्राणी:
गंमत-जंमत ही अपुली तू नको कुणाला सांगू गऽ।।

- सुभाष स. नाईक
९८६९००२१२६

# सण आणि महिने

शाळेतल्या बाई आमच्या शिकवतात खूप सोपं
लक्षात ठेवायला अभ्यास, म्हणतात लावा थोडं डोकं



चैत्र महिन्यात आला गुढीपाडवा, नवे नवे संकल्प करा
वैशाख महिन्यात अक्षयतृतीया, चांगला मुहूर्त ध्यानी धरा



जेष्ठ महिन्यात वटपौर्णिमा, सत्यवान सावित्रिची आठवण करा
आषाढ महिन्यात व्यासपौर्णिमा ,गुरुजनांचा आदर करा



श्रावन महिन्यात राखीपौर्णिमा ,बहिण भावाचा सण हा खरा
भाद्रपद महिन्यात गौरी गणपती, आनंदाला येते भरती



आश्वीन महिन्यात दसरा दिवाळी, गोड गोड फराळ रांगोळी
कार्तिक महिन्यात त्रिपुरारीपौर्णिमा, चमचम चांदण्या पाण्यात उतरल्या



मागशीर्ष महिन्यात दत्त जयंती,भक्तजन पारायण करती
पौष महिन्यात मकर संक्रात, तिळगुळ घ्या आणि गोडगोड बोला



माघ महिन्यात महाशिवरात्री शिव शंकराला बेल फुलं वाहती
फाल्गुन महिन्यात येते होळी, खायला मिळते पुरणपोळी



अशी आहे सण आणि महिने लक्षात ठेवण्याची खूण
तोंडपाठ झाले माझे दाखवू का परत बोलून



ज्योती कपिले




# सोनू,मोनू आणि परी

माझ्या फोटोवरुन मी कोण ? हे तुमच्या लक्षात आलेच असेल,मी बच्चे कंपणीची खास आवडती मैत्रिण त्यांच्या स्वप्नाच्या राज्यात फिरणारी आज मी तुम्हालाही घेऊन जाणार आहे. नदीच्या पल्याड शहरापासून दूर रानात.तो पहा माझ्या मैत्रिणीचा एक छोटाश नदी किनारी असलेला बंगला . दारात छाटी मोठी खूप झाडे आहेत. अंगणात माझ्या आवडीची फुलझाडेही तिने लावली आहेत त्यामुळे रंगीत नाजूक मखमली पंखाची फुलपाखरे रोज संध्याकाळी तिथे खेळायला येतात त्या समोरच्या झाडावर माझे काही मित्र मैत्रिणीही राहातत.

अरे हो ! तिचे नाव सांगायचेच विसरले,बोलायला लागले की असेच होते बघा. हं.तिचे नाव सोनू आहे हा तिचाच बंगला आहे.कालच दिवाळीची सुट्टी लागल्यामुळे आपण खूप गप्पा मारणार आहोत.आज मी तुम्हाला येथील माझ्या मित्र मैत्रिणींना भेटवणार आहे, चला तर माग माझ्या बरोबर.त्या चिचेंच्या झाडावर चिऊताईच्या घरट्यात चिमणदादा व त्यांची दोन गोंडस पिल्लं गाढ झोपलेली आहेत.

सोनू अंगणात आली ,घरट्याच्या दारातून आत डोकावून पाहिलं तिला स्वप्नातल्या परीची गंमत मिनूला ऐकावयाची आहे. तिने शिट्टी वाजवून गाणे गुणगुणले पण घरट्याच्या बाहेर तिचे मित्र आले नाहीत म्हणून ती परत घरात गेली आहे. आता सकाऴची वेळ असल्यामुळे मंद मंद थंडगार वाऱ्याची झुळूक अंगाला येऊन बिलगते आहे. बाहेर अंब्याच्या झाडांची पाने मजेत नाचत आहेत.बागेतल्या फुलांचा छानसा सुगंध भोवताली पसरला आहे. छोटूने आईच्या गालाला चोंच घासून भूक लागल्याचे सांगीतले चिऊताईने घरट्याबाहेर डोकावून पाहिले आजूबाजूच्या घरट्यातील शेजारी अजून साखर झोपेतच आहेत. शेजारच्या फांदीवर कोकीळा मावशीचा रियाज चालू आहे. चिऊताईने घरट्याच्या बाहेर भुर्रर्रकन झेप घेतली आणि झाडावरचं पिकलेलं फळ तोडून घेऊन आली.चोंचीणे त्यातला मऊ गर काढला आणि छोट्याच्या चोंचीत भरवला

“ ते पहा! अरे..हे काय ? त्याने पटकन थुंकून आईच्या पंखांना तोंड पुसले. नि पाव.. पाव.. म्हणून जोरात भोकाड पसरवले. तो काय म्हणतोय,हे चिऊताईला काहीच समजेना त्याचा आवाज ऐकून मिनू जागी झाली आहे. मिनू म्हणजे चिऊताईची मोठी मुलगी हे नाव त्याचे सोनूनेच ठेवलेले आहेत हे मला रात्री सोनूनेच सांगीतले आहे. शू ऽऽशूऽऽ कोणीही बोलायचं नाही, त्यांचं काय संभाषन चाललं आहे ते आता आपण ऐकू या. ”



"काय ग मिनू काय सांगीतले त्या कार्टीने "

" अगं आई तूच म्हणतेस ना कोणाविषयी वाईट बोलू नये देव पाप करतो आणि तूच सोनूला कार्टी म्हणतेस,बॅड हॅबिट हं "

"म्हणजे ग काय ?कोणी शिकवलं तुला हे ?

सोनूने ..छोटू, मॉमला सांग मी काय म्हणाले मी"

" म्हणजे वाईट सवय, छोटू रडता रडता ड़ोळे पुसत म्हणाला "

पाहिलत चिऊ ,ती मानसाची पिल्ले स्वत:ची भाषा विसरुन असचं काहीतरी बडबडत असतात. तेही बिघडलेत आणि आपल्याही बाळांना काही बाही शिकवतात.हे पहा बाळांनो मी शेवटचं सांगतो ते बंगल्यावाले आपले दुश्मन आहेत.त्यानी बंगला बांधला तेव्हा आपले घरटे उध्वस्त केले होते कितीतरी झाडं तोडली त्या शहरातल्या लोकांनी कधी घरं बांधण्यासाठी,कधी रस्ते तयार करण्यासाठी सिमेंटची जंगलं उबी  करुन तिथून आपल्याला हकलवलं आणि आता इथेही ... "ठिचमनराव बोलता बोलता थांबला.

छोट्या मध्येच म्हणाला."सगळेच माणसं वाईट नसतात " पण बाबा सोनू वाईट नाही ती खूप छान आहे. आम्ही सर्व तिच्याकडे खेळायला जातो ती आम्हाला स्टोरी सांगते, पोयम म्हणून दाखवते. मोबाईलवार गेमही खेळायला शिकवते. खायलाही देते आणि तुम्हाला माहित नाही ती मला काल म्हणाली, आपल्या जंगलात सा रे ग म ची गाण्याची स्पर्धा होणार आह

 त्यामध्ये आम्ही सर्व भाग घेणार आहोत. आई मला कोकीळा मावशीकडे गाण्याचा क्लासही लावणार आहे.नाही का ग आई ? "

नाही.. म्हणजे,अहो मुआहे.नाही का ग आई ? "

नाही.. म्हणजे,अहो मुलांचा नाद आहे

तर..चिमनरावाच्या तोंडाकडे पाहून चिमणी चाचरत बोलू लागली मी काय म्हणते जाऊ द्या तिला गाणं शिकायला.

"नाही मी ही स्पर्धा होऊ देणार नाही. आजच सर्वाच्या कानावर घालतो ही शहरातली माणसं इथे घुसली की अनर्थ होईल ते परत झाडं तोडतील,त्यांच्या गाड्यांसाठी रस्ता बनवतील कित्येक प्राण्यापक्षांचे त्यामध्ये जीव जातील आणि स्पिकरचा जोरात आवाज,धुर,धुळ त्या प्रदुषणाचाही आपल्याला त्रास होईल. नाही त्यांना विरोध करायला हवा नाहीतर ही स्वार्थी मानसं आपल्यालाही शांतपणे जगू देणार नाहीत. पण,डॅड मला गाणं शिकायचं आहे. सोनूच्या शाळेतही ती आम्हाला घेऊन जाते काल तर तिची टिचर म्हणाली आपल्या देशाचे यान मंगळावर पोहचले आहे. "

बाबा,तुम्हीच सांगीतलं होतं ना,गरूडाने म्हणे रामाला मदत केली होती.सरस्वतीचे वाहन मोर आहे आणि गणपतीचे ऊंदीरमामा,शाळेत सिंहावर बसलेली देवीही आम्ही पाहिली हो की नाही रे छोटू? "

"हो तर, शाळेत हे सर्व आम्ही आमच्या डोळ्याणे

# गोष्ट अ जीवनसत्वाची



लाल लाल झालेले डोळे चोळत खुरडत खरडत पाय ओढत जिना चढत मोहित घरी आला दप्तराचं ओझं आणि पाण्याची बाटली कोपऱ्यात लोटून दिली. मोहित आज खूपच वैतागला होता. वर्गातली सर्व मुलं त्याला 'चिनीमकाव' 'ढाप्या' चिवडत होतीच पण आज मुलीच्या रो मधून जात असताना प्रियांका उर्फ लवंगी फटाकाने जेव्हा मोहितला चिपचिप्या चिडवलं. त्यावेळी मोहितच्या अंगाचा तिळपापड झाला. मोहितनं टीव्हीचा रिमोटवर झडप घातली.टीव्हीचा आवाज ऐकून मोहितची आई बाहेर हॉलमध्ये आली. दप्तर उपसून मयूरीनं डबा काढला. ''हे काय? आज पण डबा परत? चांगले भोपळ्याचे गोड घारगे दिले होते, साजूक तुपातले ते सुदधा परत?'' मोहितनें टीव्हीवरची नजर जराही बाजूला केली नाही.

"अरे रोहीत, मी तुझ्याशी बोलतेय सांग मला, का नाही खाल्लास डबा? मी मरमर खपून चांगलं चुंगलं बनवले आणि तू उपाशी राहून परत आणतोस? मयूरीने आवाज वाढवला पण मोहितने आपल्या आवडत्या कार्टुनवरची नजर अधिकच घट्ट केली. मयूरीचा अगदी संताप झाला. हातात पट्टी घेऊन ती पुढे आली. तेवढ्यात नेहमीप्रमाणे आजीमध्ये पडली,

''अग, मुलांना मारु नये. शाळेतून आल्याआल्या काय ओरडतेस त्याच्या अंगावर त्याच्या आवडीचा टिफीन देत जा ना त्याला''

''म्हणजे? मॅगी आणि पिझ्झाच ना'' मयूरी रागारागात आत गेली. मोहितला आज उपाशीच ठेवायच असं मयूरीने ठरवलं. पण काही उपयोग होणार नव्हता. कारण आजी रात्री हळूच मोहितला जवळ घेऊन सॉस भात भरवणारच होती.

"मोहित मोहित" खालून मुलांच्या हाका ऐकू येऊ लागल्या.

"मोहित, खेळायला जातोस ना? बघ मित्र सगळे जमलेत खाली तुला बोलवताहेत खेळायला मोहित जणू बहिराच झाला होता. मोहितला त्यातलं काहीच ऐकू येत नव्हतं. आजीनं मोहितला ढोसून विचारलं,

''अरे! खेळायला जातोस न?''

नशिबानं तेवढ्यात कार्टुनमध्ये एक ब्रेक आला. ''नाही ग आजी, माझे पाय खूप दुखताहेत आणि अगं मला रन्स काढतांना जोरात धावता येत नाही मग ही मुलं मला फिल्डिंग फक्त करायला लावतात. बॉलिंग पण नाही आणि बॅटींग पण नाही'' मोहित फुरंगटला मी नाही जाणार अजिबात खेळायला परत (मोहितने) टीव्हीत डोके खुपसले.रात्रीचे आठ वाजत आले. मोहितचे पप्पा आल्याची खुणेची बेल वाजल्याबरोबर लगेच मोहित भानावर आला. पटकन त्याने टीव्ही बंद केला.

''आई,,अभ्यास घ्यायला ये ना'' मयूरीने अभ्यासाची डायरी उघडली. सगळीकडं लाल लाल खुणा होत्या. सगळी गणिते चुकली होती. ''हे काय, ३ च्या जागी ८ कसे लिहिलेस? ''आई किती आहेत नीट सांग ना. मला पुसटपुसट दिसतय.''इंग्लीश लिटरेचरच्या वहीतही तोच प्रकार कुठे श च्या जागी तर र च्या जागी श

_''अहो पण, होमवर्क करुन घ्यायालाच हवा पाहिलत याने किती चुका केल्यात? थांब मी विक्रांतला फोन करते. ''मावशी मोहित शाळेत बाकावरुन जराही उठला नाही सारखे डोळे मिचकावत असतो. त्याला बोर्डावरचं आणि नोटबुकवरचं काहीच नीट दिसत नसतं, मग सगळ्या वर्गाला डिस्टर्ब करत असतो. परवा शाळेत मेडिकल चाचणी झाली त्यानं सांगितलं नाही. मावशी त्याला मोठ्या डॉक्टरला दाखवायला सांगितलं आहे. बोलला नाही घरी?''मोयूरीने मोहितचं दप्तर उलटंपालटं केलं. दप्तरच्या एका कप्प्यातून हिरवं कार्ड निघालं.त्यावर मोहितचं अ जीवनसत्व कमी असे लिलिहले होते. असे का हो ? पूर्वी असं नव्हता करत.''

''अगं मग त्यात काय? घेऊन जा ना त्या डॉक्टर सुश्रुतकडे, माझा वर्गमित्रच आहे तो दोघांनाही ओळखतो

मोहित आईचा हात अगदी घट्ट धरुन होता. एवढ्यात डॉ. सुश्रुत पाटगावकरांनी मोहितला आत बोलावून आतमध्ये घेतले तेथे अनेक प्रकारची मशिन्स होती. मोहितचं डोक सुध्दा एका मशिनमध्ये फिक्स करण्यात आलं.बराच वेळ काळजीपूर्वक तपासणी केल्यावर डॉ.पाडगावकरांनी मोहितला उठवलं. त्यांच्याशी शेकहँड केला आणि मोहितच्या आईकडे वळून डॉक्टर म्हणाले, ''रात्रीच्या वेळी पुसट दिसणं। खुरडत चालणं, पायाची हाड दुखून वेदना होणं, त्वचा कोरडी,सुरकुतलेलीअसनंही सगळी अ जीवनसत्वाच्या कमतरतेची लक्षणं आहेत. वरचेवर सर्दी खोकला होण्याकारणाने ताप येण्याचं कारणही तेच आहे. मला सांग मोहित सकाळपासून काय काय खातोस? तो आईच्या मागे लपला मग मयूरीनेच बोलायला सुरुवात केली. ''अहो डॉक्टर हाच तर मोठा प्रॉब्लेम आहे. सकाळी उठल्यावर चॉकलेटची बिस्किटं आणि चहा शाळेच्या टिफीनमध्ये जाम आणि ब्रेड दिला तरच टिफिन खायचा नाही तर तसाच परत आणतो खरं तर, संध्याकाळी आम्ही सर्व एकत्र बसून जेवतो. आणि जेवणात भात भाजी पोळी कोशिंबीर आणि दही सर्व असतं आणि जेवल्यावर फ्रुटडिश सुध्दा पण मोहित त्या कशालाच हात लावत नाही आणि एवढा धिंगाणा घालतो की मग बाबांची ओरडा ओरड आणि शेवटी हळूच आजीच्या हातानं सॉस भात खातो''

''इथच चुकतय सारं, मोहितच्या आई या सर्व डायटमधून मोहितचं पोषण अजिबातच होत नाही. त्याला दिवसात चार वेळा तरी गाजर बीट सारख्या रंगीत भाज्या हिरव्या पालेभाज्या, प्रथिनं दूध असा चौरस आहार

घ्यायलाच हवा मी तुम्हाला अ जीवसत्वाच्या गोळ्या देतोय. त्या चालू करा आणि मोहित ही तुला माझ्याकडून स्पेशल भेट ही सी.डी.ती रात्री आई बाबांबरोबर बघ आणि मला त्य आठ दिवसांनी भेटून दाखव. मोहितच्या मनातली इंजेक्शनची भिती पळाली होती, डॉक्टर पाटगावकरांवर त्यामुळेच तो खूष झाला त्याशिवाय सीडी बघायची होतीच.

दुसऱ्या दिवशी रात्री बाबांनी सीडी लावली. त्यात एक गोष्ट दाखवली होती. ती एक गोष्ट अगदी मोहित सारख्या मुलांची पिटूंची चौरस आहार न घेतल्यामुळे त्याला झालेले वेगवेगळे रोग कमतरता सर्व पाहतांना मोहितच्या डोळ्याला धार लागली. हळूच आईच्या कुशीत शिरत मोहीत म्हणाला,''आई, मला उद्यापासून डब्यात मेथीची भाजी देआणि पोळी देत जा हं मी नाही आता पिझ्झा आणि मॅगीचा हट्ट धरणार. तू देशील ते खाईन आणि हो रोज मिल्कशेक देशील ना फळांचा ? मला तो खूप आवडतो.

''माझं शहाणं बाळ कसं? मयूरी मोहितला जवळ घेऊन त्याचा पापा घेत ती म्हणालीी.

मुलांनो, मग तुम्ही काय ठरवलय? मोहित सारखं डॉक्टरकडे जायचं का रोज चौरस आहार घ्यायचा.''!

डॉ. संपदा पाडगावकर

# SKEET

Never insult those who are Poor or Ugly!

mohna karkhanis



*A bright,sunny morning.*
*A garden of roses and other flowers. All flowers are talking to each other.*

***Rose: (****proudly to other flowers )* I am the king of all flowers. I am a symbol of beauty and love.

***Jasmine :*** we all know that you are the king of flowers. But remember each flower in this garden has some unique qualities. We all are members of a big family.
Each member in this family is important.

***Rose :*** *( laughs loudly)* Hey Jasmine , please do not tell me about your ideas about a family. I am supposed to be the king of flowers.

***Marigold:*** Brother rose, we all have grown together in this garden. Our gardener chacha has taken a lot of efforts to nurture us. When dear breeze touches us lovingly ,we all feel so happy. We all share our happiness and sorrows with each other.

***Lily:*** *(with a delicate smile)* Yes dear Marigold. We all are like a family and each member in this family plays a prime role. e.g. People





***Sunflower:*** *(smiling brightly)* Our Tulsi didi is mainly used for medicinal purposes. It is supposed to be a symbol of purity and piousness. Friend lotus is used to worship Lord Vishnu.

***Hibiscus :*** *(first time takes part in this conversation)* Yes Sunny, and people use your oil for cooking. People love our scents and manufacture perfumes from us.

***Jasmine:*** All of us should remember that besides our sisters and brothers, each part of our tree plays a vital role in our life.

***Rose :***
Do you mean our roots , stem, leaves and even thorns play an important role in our life? I certainly do not agree with you. People are attracted towards me and not our roots,stems and leaves . In fact I hate these ugly thorns.



***Jasmine :*** Rose brother, you should not be so much proud of yourself. No creature however small is insignificant.

***Rose :*** *( laughs)* hahaha . Listen all of you, I do not believe in what you are saying.
(Leaves, stem, thorn and roots of rose bush take part in their conversation)

***Leaves:*** Dear rose, we manufacture food for you.
***Stem:*** We give you support.

***Thorns :*** We protect you from getting plucked.



***Roots:*** Hello everyone, do not forget us. We remain underground to give you support and food.

***Rose:*** Oh please stop it. I am the best and you all are surviving because of me.



*(While this conversation is going on ,* a naughty boy enters the garden and starts plucking the flowers.He plucks many flowers and starts playing with their petals. Suddenly the boy is pricked by the thorns of the rose plant.Startled and hurt the boy leaves the garden. Thus rose and other flowers are saved .)

***Rose :*** Dear brother thorn , today I have realised my mistake. Please allow me to apologize for my wrong accusations. Only outward beauty is not significant , it is the inward quality that matters. We all together make the nature and the nature brings the heaven on earth.

***Everyone together:*** Yes, people only admire flowers but destroy the nature. Actually if they try to breed all the flowers, then this place will become a heaven. People should know more about different flowers and their uses.Remember we all depend on each other. Afterall nature is everyones's best friend .

*(*All flowers lived in that garden happily forever and thus the garden became popular as HAPPY and JOY garden)







# निवीची करामत

सुमन नवलकर

आम्ही हिमाचल प्रदेशात सहलीला गेलो होतो. तिथे एका बागेत फुलझाडांच्या बियांची पाकिटं विकायला ठेवली होती. पाकिटांवर फुलांची छान-छान चित्र आणि त्या त्या फुलांच्या बिया त्या त्या पाकिटामध्ये एका पाकिटावर छान पिवळ्या-जांभळ्या फुलांचं चित्र होतं. म्हणजे एकाच फुलाच्या काही पाकळ्या पिवळ्या, तर काही पाकळ्या जांभळ्या.

"ह्या बिया घेऊया ना आई," मी आईच्या मागेच लागले.

"उगीच नको निवी. तुझ्या आजीने आणल्या होत्या एकदा कुठूनशा बिया पण आपल्या हवेला रुजल्याच नाहीत त्या पैसे फुकट गेले."

"घे ना ग आई. बघ किती सुंदर फुलं आहेत. पाकिटावर." मी मागेच लागले. फुल खरंच खूप छान होती. घरी गॅलेरीतल्या कुंडीत झाडाला अशी फुलं आली तर किती मजा वाटेल.

"बिया खूप महाग आहेत निवी. रुजल्या नाहीत तर इतक्या लांब आणून परत पण देता येणार नाहीत." आईने मला समजावायचा प्रयत्न केला.

"घे ना ग आई, मग दुसरं काही मागणार नाही मी, अगदी घरी जाईपर्यंत , प्रॉमिस." "इतकी मागे लागलीय, तर घेऊया ना एक पाकीट," बाबांनी असं म्हटल्यावर आईचा नाईलाजच झाला. पर्समधून पैसे काढून देताना तिने दुकानदाराला विचारलं,"हमारे यहाँ आएँगे क्या ये फूल ?"

"पक्का आएँगे बहेनजी." दुकानदाराने खात्रीपूर्वक सांगितले.

मग तर काय, घरी पोहोचल्यावर मी पहिलं काम काय केलं, तर गॅलेरीतल्या रिकाम्या कुंडीत पाकिटातल्या बिया लावल्याच.

खर तर कुंड्यामधल्या झाडांना पाणी घालायचं काम सरवूबाईचं. पण चुकून ती कुंडी रिकामी आहे असं वाटून पाणी घालायला विसरल्या तर ? म्हणून सरुबाई झाडांना पाणी घालून घरी गेल्या की मी एका छोट्या पेलातून पुन्हा पाणी आणून त्या रिकाम्या कुंडीत घालणारच. आता दोन-दोनदा पाणी मिळालं तर बियांची काय बिशाद की रुजणार नाहीत ?

पंधरा दिवसानंतर कुंडीत छोटी-छोटी रोप आली आणि भराभर वाढायलाही लागली. जरा मोठी झाल्यावर त्यांना कळ्याही आल्या आणि लवकरच पिवळी-जांभळी अशी मिश्र रंगांच्या पाकळ्यांची सुंदर फुलं रोपांवर डोलायला लागली. अगदी पाकिटावरच्या चित्रातल्या फुलांसारखीच सुंदर होती फुलं. त्या बागेतल्या दुकानवाल्याने आम्हाला फसवलं नव्हतं मुळीच.

तर परवा मी घरात छोट्या रबरी बॉलने टप्पे-टप्पे खेळताना अचानक बॉल या नव्या फुलांच्या कुंडीच्या बाजूने गेला, म्हणून मी बॉल काढायला कुंडीपाशी वाकले. फुलांमधून छान सुगंध येत होता. बॉल काढायसाठी असा कितीसा वेळ लागला असेल पण तेवढया थोड्या वेळातच मला गरगरलं, चक्कर येवून पडते की काय असं वाटलं. बॉल घेऊन मी आत आले आणि खुर्चित धप्पकन बसलेच.

किती वेळा मला गरगरतच होतं. जरा बर वाटल्यावर मी परत गॅलरीत गेले. आणि कुंडीतल्या फुलांचा पुन्हा वास घेतला. पुन्हा मला चक्कर आली. या वेळी जरा जोरातच मी पडता-पडता ग्रीलला पकडलं आणि पुन्हा धडपडत खुर्चीवर येऊन बसले. मग माझी खात्रीच झाली की फुलांच्या वासामुळेच चक्कर येतेय.

संध्याकाळी आई-बाबा आल्यावर त्यानाही मी ही गंमत सांगितली. दोघंही हसले. माझ्या बोलण्याची गम्मत वाटली त्यांना. खरं मात्र वाटलं नाही मुळीच. बंटीला मात्र या कुंडीजवळ जाऊ देता कामा नये. तो खुप लहान आहे. त्याला चक्कर आली तर, त्याला समजणार देखील नाही की त्याला काय होतय आणि तो कोणाला सांगू देखील शकणार नाही. त्यामुळे बंटीला ती सुंदर फुलं दाखवायचा माझा जो बेत होता, तो मी रद्द करुन टाकला.

या गोष्टीला चार-पाचच दिवस झाले असतील आणि अचानक रविवारी दुपारी बेल वाजली. आईने दार उघडून पाहिलं तर बाहेर दोन माणसं डोक्यावर आंब्याच्या पाटया घेऊन उभी "नकोत आंबे आम्हाला" म्हणून आई दार बंदच करणार होती. तेवढयात त्यातल्या एकाने डोक्यावरची पाटी उतरवली आणि आतले दोन आंबे काढून तो म्हणाला, "फळ तर बघा" असली हापूस आहे. रत्नागिरी हापूस."

तेवढ्यात बाबा आतून आले आणि त्यांनी आईला विचारलं," "कोण आलय ग नयना ? " आणि आंबेवाल्याला पाहून म्हणाले, " घे चांगले असतील तर, मी परवा आणलेले संपायला पण आलेत. निवीला पण आवडतात ना आंबे ?"

खरं तर आंबे सर्वांनाच आवडतात. आईला पण, बाबांना पण, आणि मला पण. बंटीलाही रस पाजला तर तो मान उभी हलवून-हलवून आणखी रस मागतो. पण म्हणायचं काय तर "निवीला पण आवडतात ना आंबे ?"

"आत येऊ का बाई ?" जिन्यात गवत पसरेल ना ? दोघांपैकी एक जण म्हणाला. आईने मग सुरक्षा दरवाजा उघडून दोघानाही आत घेतलं. एरव्ही आम्ही कोणालाही घरात घेत नाही. बाहेरचा सुध्दा दरवाजा उघडत नाही. पण बाबा घरात आहेत म्हटल्यावर आईला घाबायचं कारणच नव्हतं ना.

आंबेवाल्यानी पाट्या खाली ठेवल्या आणि एकाने आतून थोड गवत जाढलं. मग बाबा-आई आंबे बघायला वाकल्यावर पटकन चाकू काढला. मला तर वाटल की आंबा कापून दाखवेन चव कशी आहे ते पाहाण्यासाठी. पण त्याने चक्क बाबांच्या पुढ्यात चाकू धरला आणि आईला म्हणाला,"दागिने काढा अंगावरचे".

आई थरथरायलाच लागली. बाबानाही घाम फुटला म्हणाला, "दागिने काढा अंगावचे."

मला तर चक्कर यायला लागली. त्या फुलांचा वास घेतल्यावर आली होती ना, तशीच. काढा लवकर दागिने" आंबेवाला पुन्हा म्हणाला आई काय करणार ? तिने बांगड्या, गळातलं अस काढायला सुरुवात केली. तेवढ्यात दुसऱ्या आंबेवाल्याने त्याच्या खिशातून मोठ्ठा चाकू काढून बाबांच्या पुढ्यात धरला, म्हणाला "पैसे काढा असतील तेवढे. मोबाईल द्या दोघांचेही लवकर द्या, लवकर."

त्यांनी अजून मला पाहिलं नव्हतं. वंटी तर आतल्या खोलीत झोपला होता. मी जरा लांब गॅलेरीच्या दरवाजापाशी उभी होते. पण मला घाम मात्र फुटला नाही. कारण उन्हाळ्याचे दिवस असले तरी गॅलेरीतून मस्त वारा येत होता. वाऱ्यामुळे कुंडीतल्या फुलांचा वासही येत होता. त्यानी मला चक्चर यायला लागली होती पुन्हा. चक्कर - चक्कर यायच्या आधिच मला एक कल्पना सुचली टी.व्ही वरच्या चिंटू च्या साहसकथा पाहून सुचतात मला कधी-कधी छान छान कल्पना. पटकन कुंडीतली पिवळी- जांभळी फुलं तोडली, दोन्ही हातांनी जितकी तोडता येईल तितकी. आई-बाबांपाशी आले, आई आपली दागिने काढतेय, बाबा खिशातून मोबाईल, पैसे वगैरे.

मग चिंटू अंगात संचारल्यासारखी मी पुढे झाले.

हातात सुऱ्या घेऊन बसलेल्या त्या दोघा आंबेवाल्यांच्या नाकापाशी ती फुलं धरली. पहाता पहाता ते महबूत आंबेवाले भूईसपाट झाले. मग बाबांनी त्यांच्या दोघांच्या हातातल्या सुऱ्या काढून घेतल्या आणि पोलिसांना फोन लावला. आईनेही मग उतरवलेले दागिने पुन्हा पटकन चढवले आणि पुन्हा-पुन्हा ती फुलं कुसकरुन त्या आंबेवाल्यांच्या नाकांसमोर धरत राहिली. तेवढयात पोलिस आलेच.

पोलिस आंबेवाल्यांना उचलून घेऊन गेले. पण इंस्पेक्टरकाका आई-बाबांना प्रश्न विचारण्यासाठी थांबले होते. एव्हाना आई-बा सावरले होते. "ते बेशुध्द कसे पडले बुवा ?" इंस्पेक्टरकाकांनी विचारलं.

"ती आमच्या निवीची करामत" बाबा म्हणाले. मग जांभळया-पिवळ्या फुलांच्या मदतीने मी आंबेवाल्याना कशी चक्कर आणली ते बाबांनी सांगितलं.

मग इंस्पेक्टरकाका आलेच गॅलेरीत आमची रोप पहायला. घाई-घाईत उपटल्यामुळे रोपं आणि फुलं अगदी कोमेजली होती. तरीही कुंडीचे फोटो इंस्पेक्टरकाकांनी त्यांच्या मोबाईलवर घेतलेच आणि मग वाकून फूलांचा वासही. गरगरतयसं अस वाटल्यावर मग ते पटकन उभे राहिले.

एव्हाना इमारतीत पोलिसांना पाहिल्यामुळे त्यांच्या पाठोपाठ सगळे शेजार पाजारचे जमले. आवाजाने बंटीला जाग आली असणार. तो रांगत-रांगत आला. समोर जमिनीवर कुसकरलेली फुलं पडली होती. रांगत-रांगत बंटी फुलांपाशी पोहोचला. तो फुलं हातात घेणार तेवढ्यात आईचं लक्ष गेलं म्हणून बरं. तिने पटकन बंटीला कडेवर घेतलं. त्या दिवशी रात्रीपर्यंत इमारतीतली माणसं माझं कौतुक करायला येत होती. कुंडीतली रोपंही पाहून जात होती. साहजिकच रात्री आम्हा सर्वांनाच झोपायला उशीर झाला.

मला जाग आली तेंव्हा आई कुठे दिसली नाही. स्वैपाकघरातच असणार, म्हणून मी पाहायला गेले तर तिथेही नव्हती ती. तेवढ्यात गॅलेरीत खुडबुड ऐकू आली म्हणून मी तिथे गेले. पाहते तो काय आईच्या हातात जांभळ्या- पिवळ्या फुलांच्या बियांचं ते पाकीट होतं. आई त्यातून नव्या बिया काढून कुंडीत लावत होती.

"महाग म्हणून घेत नव्हतीस ना आई तू या बिया ?" मी म्हटलं.

"महाग होत्या खऱ्या. पण त्याच्यामुळे सोनं. पैसे, मोबाईल सगळ तर वाचलंच. पण आपले लाखमोलाचे जीवही वाचले निवी. आईने बोलता-बोलता त्याच मातीच्या हातांनी मला जवळ घेतलं."

तेवढयात बंटी रांगत-रांगत आलाच. मग आईने त्याच मातीच्या हातांनी त्याला उचलल आणि मला म्हणाली, " ते बियांचं पाकीट आत बांधून टेबलावर ठेव निवी. महागाचं असलं तरी फार मोलाचं आहे ते."

पुढल्या वर्षी आमचे काका हिमाचल प्रदेशात सहलीला जाणार आहेत, त्या फुलांच्या बियांच्या किती-किती पाकिटांना मागणी आहे. प्रवासाहून परत येताना बहुतेक त्या पाकिटांनीच भरणार आहे काकांची बॅग.

डॉ. सुमन नवलकर
०२२-२४१५०६६५
९९६९०२८९६७



# नेट सेट गो




माझ्या प्रिय बालमित्रांनो “नेट से गो” या सदरात तुमचे स्वागत आहे!

कॉम्प्युटर म्हटलं की तुम्ही सगळे खूप खूप खुश असता. हो ना? कॉम्प्युटरवर आधी कोण बसणार यावरून तुम्ही ताई-दादा असो वा बाबा, सगळ्यांना मागे टाकता. कधी कधी तर तुम्हाला ताई-दादा सारखा अगदी अभ्यासही कॉम्प्युटरवर करावा असंच वाटत असतं. पण त्याला अजून अवकाश आहे. चला तोपर्यंत मी तुम्हाला ‘चेरी Land’ च्या प्रत्येक अंकात अशा काही साईटची नावं सांगेन की त्यामुळे तुम्हाला कोणी कॉम्प्युटरवर बसला आहात म्हणून ओरडणार नाही. ह्या साईटमुळे तुम्हाला तुमच्या शाळेतील प्रोजेक्ट बनवायला मदत होईल. तर कधी तुम्हाला वक्तृत्व स्पर्धेसाठी काही अद्ययावत माहिती मिळवता येईल.

काय मग खुश ना?

आजच्या साईटचो नाव आहे “बालसंस्कार.कॉम”. तुमच्या इंटरनेटच्या ॲड्रेस बारमध्ये www.balsanskar.com असे टाईप करा आणि ह्या साईटवरील ज्ञान, मनोरंजनयुक्त माहितीचा तुमच्या जीवनात फायदा करून घ्या.

ह्या साईटवर तुम्हाला विविध सण, उत्सव, धार्मिक कार्यक्रमाबद्दल माहिती मिळेल, जी तुम्हाला तुमच्या शालेय जीवनात नक्कीच उपयोगी पडेल. तुमच्या मनावर चांगले संस्कार करेल. एवढेच नाही तर ही साईट तुम्ही तुमच्या आई-वडिलांनाही दाखवा. ह्या साईटवर तुमच्या पालक आणि शिक्षकांसाठीही बरीच उपयुक्त माहिती आहे. अरे हो.., एक महत्वाचे तर सांगायचे राहिलेच. ते म्हणजे हि साईट मराठी, इंग्रजी आणि कन्नड भाषेतही उपलब्ध आहे. मग काय आहे की नाही मज्जा?

आता एक काम करा. अभ्यास करून झाला, हे पुस्तक वाचून झाले, आई-बाबांना मदत करून झाली की फावल्या वेळात ही साईट उघडा आणि त्यावरील माहितीने समृद्ध व्हा!

– *ज्योती कपिले*

*९७६९१४१०७४*



# गंम्मत कोडी

१) हिरवा पिवळा रंग, आंबट - गोड चव
क जीवनसत्वाने भरपूर
गावं माझं नागपूर ।
ओळखा कोण ?

२) आगमनाने याच्या सृष्टी फुलते
पानोपानी चैतन्याची खूण उमलते
कोकीळाही कुहूकुहू करते
आमराई मोहरून जाते
माघ शुद्ध पंचमीला, सोळा कलांनी फुलणारा ऋतू
ओळखा कोण ?

३) काळा काळा रंग, वस्तू कुरतडण्यत दंग
मनीमाऊ येताच पळून जातो
बिळात जाऊन दडून बसतो
ओळखा कोण ?

४) कधी ढोबळी, कधी काकडी
कधी जाडी, कधी बारीक
कोल्हापूरची प्रसिद्ध लवंगी
खाताच येत डोळ्यात पाणी
ओळखा कोण ?

५) लांब लांब दाढी मिशा
पाटीलबुवांच्या छान
लपवलेत त्यांनी मोती
ठेवून पानावर पान
भाजा किंवा लाह्या करा
आवडीने खातात लहानसहान!
ओळखा कोण ?

६) कोकणातून आलो टाकीत धापा
आता बरका म्हणा व कापा
अंगाखांद्यावर झाडाच्या फळं येतात
कच्ची असेल तर भाजी म्हणून खातात
वरून आहे एकदम काटेरी अंग
मात्र गोंड, रसाळ अंतरंग!
ओळखा कोण ?

७) एका हट्टी मुलीला
लख्ख प्रकाशाची आवड फार
मागे, पुढे तुमच्या बरोबर फिरणार
अंधाराला मात्र घाबरते फार
आणि दडून बसते मग गुडूपगार !
ओळखा कोण ?

८) नाही बदक, नाही बगळा
हा आहे पक्षी आगळावेगळा
दूध आणि पाणी वेगळं करतो
आणि मोत्याचा चारा खातो
आकाशातून तरंगत जातो
जणू शुभ्र फुलांची माळ
डौलदार, राजबिंडा विहरतो तळ्यात
यांच्यामुळे शोभा, राजाराणीच्या काळात
ओळखा कोण ?

९) एका महालात बत्तीस खोल्या
त्यात राहते एकच राणी
सारखं सारखं मागे पाणी
ओळखा कोण ?

१०) कधी पाण्यात पोहतो कधी जमिनीवर चालतो
ढालीसारख्या पाठीला याच्या
खडक समजतात दुरून
मात्र जवळ येताच कुणी
हातपाय घेतो हा गोळा करून
मंदिरापुढे असतं याचं स्थान
सशाबरोबर शर्यतीत मिळवला पहिला मान!
ओळखा कोण ?

**ज्योती कपिले**
**९७६९१४१०७४**